






नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका






महाराष्ट्र साहित्य परिषदेचें त्रैमासिक मुखपत्र



संपादक

वा. रा. ढवळे

वर्ष ३१ : अंक १२३ ऑक्टोबर - नोव्हेंबर - डिसेंबर १९५७

या अंकांत

डॉ. के. ना. वाटवे, वसंत स. ज़ोशी, प्रा. सुरेश डोळके, प्रा. वा. दा. गोखले, डॉ. र. वि. हेरवाडकर, प्रा. पण्डित आवळीकर, शिवाय संपादकीय, परिषद्वार्ता, पत्रव्यवहार इत्यादि.

# नवीन सभासद

### तहहयात

१. श्री. ग. वि. अकोलकर, नाशिक.
२. डॉ. ज. ग. ठाकूर, इंदूर ( म. प्र. ).
३. श्री. पं. अ. कुलकर्णी, पुणें.

### साधारण

१. सौ. शैलजा मनोहर पाठक, ओगलेवाडी ( उ. सातारा ).
२. श्री. म. र. देशपांडे, कोल्हापूर.
३. श्री. र. पां. भाट, भवानीनगर ( द. सातारा ).
४. प्रा. मनू गंगाधर नातू, अमरावती ( विदर्भ ).
५. श्री. लीला शंकर जमदग्नी, सांगली ( द. सातारा ).
६. श्री. बा. भी. कोगनोळे, सांगली ( द. सातारा ).
७. श्री. आ. रा. कुलकर्णी, सांगली ( द. सातारा ).
८. श्री. भा. वा. गोगटे, सांगली ( द. सातारा ).
९. श्री. जी. एस्. कड्डकर, पवारवाडी ( उ. सातारा ).
१०. श्री. म. र. कवठेकर, पुणें २.
११. श्री श्री. ना. वैद्य, जामखेड ( अह. नगर ).
१२. श्री. भा. वि. मोकाशी, पुणें २.
१३. श्री. दत्तोपंत धोंड, परळी वैजनाथ ( बीड ).
१४. श्री. कृ. न. कुलकर्णी, निपाणी ( बेळगांव ).
१५. श्री. सं. ध. सिताफळे, कुरनूर ( सोलापूर ).
१६. प्रा. हे. वि. इनामदार, पुणें ४.
१७. श्री. मु. व्यं. तावरे, पुणें ४.
१८. श्री. सी. म. बापट, शहापूर ( बेळगांव ).
१९. श्री. य. द. केळकर, सांगली ( द. सातारा ).
२०. प्रा. मो. स. गोसावी, पुणें २.

---

महाराष्ट्र साहित्य परिषदेचें त्रैमासिक मुखपत्र

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

संपादक : वा. रा. ढवळे



वर्ष ३१, अंक १२३ ऑक्टोबर–नोव्हेंबर–डिसेंबर १९५७

## या अंकांत



संपादकीय
पत्रव्यवहाराचा पत्ता :
१२६ डी. फणसवाडी, मुंबई २.

महाराष्ट्र साहित्य परिषद्,
टिळक रस्ता, सदाशिव पेठ, पुणें २.

# परिषद्-वार्ता

( चिटणिसांकडून )

**कै. माधवजूलियन स्मृतिदिनः**—कै. माधवजूलियन स्मृतिदिनानिमित्त प्रा. वॉ. वि. देशपांडे यांचे 'सामाजिक चळवळींचे ललितकृतींत पडणारे प्रतिबिंब' या विषयावर दि. २९।११।५७ ला व्याख्यान झालें.

**दिवाळी वाङ्मय-समालोचन** :—यंदा दिवाळी वाङ्मय-समालोचन व्याख्यान-मालेंत प्रा. माधव मनोहर (कथा, दि. २४।११।५७) प्रा. ह. श्री. शेणोलीकर (काव्य, दि. २७।११।५७) व डॉ. मा. गो. देशमुख (टीका—दि. १।१२।५७) अशीं व्याख्यानें झालीं.

**भेटी, सत्कार इत्यादि** :—दि. १७ ऑक्टोबरला मराठवाडा विद्यापीठसमितीच्या पुढील सदस्यांनी परिषदेस भेट दिली. न्यायमूर्ति श्री. पळनिटकर, श्री. सेतु माधवराव पगडी, डॉ. वि. भि. कोलते, श्री. स. कृ. वैशंपायन, नागपूरचे सुप्रसिद्ध प्राध्यापक श्री. अ. ना. देशपांडे व पुणें महापालिकेचे प्रशासक श्री. श्री. वि. भावे यांनी (अनुक्रमें दि. २७ ऑक्टोबर व १ नोव्हेंबर रोजीं) परिषदेस भेटी दिल्या. परिषदेच्या कार्याची सर्वांना जरूर ती माहिती करून देण्यांत आली आणि सर्वांचा परिषदेतर्फे सत्कार करण्यांत आला.

मुंबई येथे झालेल्या श्री. मो. ग. रांगणेकर सत्कारप्रसंगीं व सातारा येथे नुकत्याच झालेल्या नाट्यसंमेलनप्रसंगीं परिषदेतर्फे प्रा. चंद्रकुमार डांगे (चिटणीस) हे प्रतिनिधि म्हणून उपस्थित होते.

**प्रा. श्री. म. माटे यांचे निधन**:—प्रा. श्री. म. तथा बापूसाहेब माटे हे बुधवार दि. २५ डिसेंबर १९५७ ला दुपारीं निधन पावले. त्यांच्या शवास परिषदेतर्फे पुष्पहार घालण्यांत आला व अंत्यसंस्काराचे वेळी कार्याध्यक्ष प्रा. चिं. वि. जोशी यांनी भाषण करून परिषदे-तर्फे श्रद्धांजलि वाहिली. कै. माटे यांच्या निधनानिमित्त परिषदेचें कार्यालय गुरुवार दि. २६ डिसेंबरला बंद ठेवण्यांत आलें होतें.

कांही संस्थांचे दुखवट्याचे ठराव परिषदेकडे आले आहेत.

**नियामक मंडळाची निवडणूक**:—नियामक मंडळासाठी विभागवार जेवढ्या जागा आहेत त्यांच्यापेक्षा अधिक नांवें सुचविलीं गेलीं नाहीत. त्यामुळे ज्यांचीं नांवें, संमतिसह, सुचविण्यांत आलीं ते सर्व सदस्य अविरोध निवडून आले आहेत. मात्र '**कार्याध्यक्षा**'च्या एका जागेसाठी दोन नांवें आलीं असल्यामुळे, तेवढी निवडणूक क्रमप्राप्त आहे. ह्यासाठी मतपत्रिका ह्या अंकांतून पाठविण्यांत येत असून, ती वेळेवर भरून पाठविण्याच्या सूचनेकडे सर्वांनी लक्ष द्यावें.

ज्या सभासदांनी चालू वर्षाअखेरची वर्गणी पाठविली नसेल त्यांनी ती तातडतोब पाठविण्याची कृपा करावी. बाकीदार सभासदाचें मत मोजलें जाणार नाही.

---

अनुक्रमणिका

महाराष्ट्र साहित्य परिषदेचें त्रैमासिक मुखपत्र

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

संपादक : वा. रा. ढवळे

वर्ष ३१, अंक १२३ ऑक्टोबर–नोव्हेंबर–डिसेंबर १९५७

## संपादकीय

### कै. श्री. म. ऊर्फ बापुसाहेब माटे

समाज व साहित्य या दोन्हींबद्दल सारखी आस्था व कळकळ वाळगणारी जुन्या पिढींतील एक थोर, तत्त्वचिंतक, बुद्धिमान् व प्रभावी व्यक्ति कै. श्री. म. ऊर्फ बापुसाहेब माटे यांच्या निधनानें महाराष्ट्रांतून नाहीशी झाली याबद्दल अखिल महाराष्ट्र आज हळहळत आहे. कै. तात्यासाहेब केळकरांच्या नंतर एवढा मोठा धक्का दुसऱ्या कोणाच्याहि निधनाने महाराष्ट्राला बसलेला नाही ! गेलीं दोन वर्षे माटे मृत्यूशीं झुंज खेळत होते. कॅन्सरसारख्या महाभयंकर शत्रूशीं कधी हसतखेळत तर कधी रडत ते मुकाबला करीत होते. आणि 'मी व मला दिसलेलें जग' या आपल्या आत्मचरित्रपर ग्रंथाच्या लेखनाचें कार्य संपविल्यावरच ते मृत्यूच्या स्वाधीन झाले ! मृत्यु त्यांचें दुर्बल शरीर घेऊन गेला पण त्यांचें पीळदार व्यक्तित्व, त्यांची सूक्ष्मदर्शी व विश्लेषक बुद्धि, कणखर मन, मराठी भाषा व संस्कृति यांचा जाज्वल्य अभिमान, माणुसकीचा गहिंवर, दलितांच्या उद्धाराची तळमळ इत्यादि त्यांच्या विविध गुणांचें व शक्तीचें प्रतिबिंब असलेलें त्यांचें वाङ्मय व कार्य यांना धक्का लावण्याचें सामर्थ्य मृत्यूच्या हातांत नाही ! मृत्यूवर अगर काळावर मात करून त्यांच्या कणखर व जिवंत व्यक्तित्वाच्या खुणा त्यांच्या विपुल व विविध स्वरूपाच्या वाङ्मयाच्या रूपाने येथे चिरकाल राहतील यांत शंका नाही. महाराष्ट्रांतील अनेक संस्थांशीं या नाही त्या कारणाने त्यांचा संबंध आलेला असला तरी महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या बाबतींत त्यांना विलक्षण आपुलकी व प्रेम वाटे. किंबहुना महाराष्ट्र साहित्य परिषदेला जें आजचें स्थान व स्वरूप प्राप्त झालेलें आहे त्याचें बरेचसें श्रेय माटे यांच्या व्यापक धोरणाला व चिकाटीच्या कार्यपद्धतीलाच द्यावें लागेल. कोणत्याहि कार्याला अगर लेखनाला वाहून घेतल्यानंतर त्यांत माघार अशी त्यांनी कधीच घेतलेली नाही. त्यांचें मन हें जितकें हळुवार तितकेंच तें कठोर व करारी होतें. किंबहुना त्यामुळेच त्यांचें तत्त्वचिन्तनपर वाङ्मय जितकें प्रभावी झालें तितकेंच यश त्यांच्या ललित साहित्यालाहि मिळालें. पन्नाशी उलटल्यावरहि तांबे यांनी जशा हृद्य व प्रभावी

अनुक्रमणिका



कविता लिहिल्या त्याचप्रमाणे माटे यांनीहि पन्नाशीनंतरच हृदयाचा ठाव घेणाऱ्या कथा लिहिल्या. माटयांचें लेखन जितकें प्रभावी तितकेंच त्यांचें वक्तृत्वहि प्रभावी असे. त्यांच्या लेखनाच्या शैलीचें अनुकरण करणें जितकें कठीण तितकेंच त्यांच्या वक्तृत्वाच्या शैलीचें अनुकरण करणें कठीण होतें. त्यांच्या लेखणीचा अगर वाणीचा एकेक शब्द त्यांच्या स्वतंत्र बुद्धीचा व मूलगामी दृष्टीचा प्रतीक असे. त्यामुळेच त्यांचे सार्वजनिक आयुष्यांतील विरोधकहि त्यांच्याबद्दल कमालीचा आदर बाळगीत. म्हणूनच एका दृष्टीने माटे यांना युग-पुरुष म्हटल्यास अतिशयोक्ति होणार नाही. केळकरांच्यानंतर एवढ्या प्रभावी व्यक्तित्वाचा पुरुष महाराष्ट्रांतून माटे यांच्या निधनाने नाहीसा होत आहे यामुळेच मन हळहळतें ! माटे शेवटच्या क्षणापर्यंत कार्यमग्न होते. शेवटपर्यंत त्यांचें मन तरुण व विचारप्रवण होतें. म्हातारे असे ते कधीच दिसले नाहीत. त्यांचे कित्येक संकल्प अपुरे राहिले. जगण्यासारखें त्यांच्यापाशी पुष्कळ असतांनाच त्यांना मरण आलें. एका दृष्टीने तसें मरण येण्यांत मजा असली तरी महाराष्ट्राची त्यांच्या मरणाने मोठीच हानि झाली आहे.

## कै. नरहर शंकर रहाळकर

केशवसुतांचे समकालीन कवि व त्यांच्या कवितेचे एक आद्य टीकाकार श्री. नरहर शंकर रहाळकर हे इन्दूर मुक्कामीं ता. ७ डिसेंबर १९५७ रोजीं दिवंगत झाले. कै. भास्करराव तांबे यांचे ते एक निकटवर्ती स्नेही होते. ज्या दिवशीं व ज्या महिन्यांत तांबे निवर्तले त्याच दिवशीं व त्याच महिन्यांत रहाळकरांना मृत्यु यावा हा एक मोठा अकल्पित योगायोगच म्हटला पाहिजे ! केशवसुतांना ते काव्याच्या बाबतींत गुरु मानीत; इतकेंच नव्हे तर, केशवसुतांनीच आपल्याला काव्यदृष्टि दिली असें ते नेहमी अभिमानाने सांगत असत. केशवसुत मुंबईहून भडगांवला इ. स. १८९८ त गेले त्या वेळीं त्यांच्याशीं रहाळकरांचा परिचय झाला व त्या परिचयाचें स्नेहांत रूपान्तर होऊन तो स्नेह अखेरपर्यंत टिकून राहिला.

केशवसुतांच्या मृत्यूनंतर जवळजवळ बारा वर्षांनी हरिभाऊ आपटे यांनी केशवसुतांची कविता पुस्तकरूपाने प्रसिद्ध केली; पण त्यांच्या कवितांचें मर्म नि महत्त्व विशद करण्याचें कार्य 'केशवसुत आणि त्यांची कविता' हा मनोरंजन मासिकांत १९१८ सालीं लेख लिहून रहाळकरांनीच प्रथम केलें. रहाळकर हे स्वतः सत्कवि असून त्यांच्याहि कविता 'मनोरंजन' मासिकांत प्रसिद्ध होत असत. त्यामुळे एका कवीने दुसऱ्या एका समकालीन कवीच्या काव्याचें मूल्यमापन करण्याचा प्रयत्न जितका अभिनव तितकाच तो कौतुकास्पदहि होता. केशवसुतांची कविता सर्वसाधारण मराठी वाचकांपर्यंत पोचविण्याचें कार्य रहाळकरांच्या लेखाने त्या काळीं केलें हेंहि लक्षांत घेतलें पाहिजे. त्या दृष्टीने केशवसुतांच्या कवितेचे ते एक आद्य टीकाकारच होते. केशवसुतांचें छायाचित्र उपलब्ध नव्हतें; पण रहाळकरांनी त्यांच्या शारीरिक ठेवणीचें व व्यक्तित्वाचें जें शब्दचित्र रेखाटलें होतें त्याच्या आधारानेच केशवसुत कवि 'होता कसा आननीं' हें भावी पिढीला ओळखतां आलें.

रहाळकरांची काव्य-निर्मिति ही मोठी डोळ्यांत भरण्यासारखी अगर वैशिष्ट्यपूर्ण नसली तरी त्यांच्या मनोरंजन व इतर ठिकाणीं आलेल्या कवितांचा 'पुष्पांजली' या नांवाने खुद्द त्यांनीच इ. स. १९२३ सालीं संग्रह प्रसिद्ध केलेला आहे. शिवाय 'बिल्वदल' या नांवाची एक गुरुभक्तिपर लहानशी कविता व 'चिर-विरह-गीताष्टक' या नांवाची स्वतःच्या मृतपत्नीविषयक कविता अनुक्रमें १९२५ व १९४८ सालीं त्यांनी पुस्तकरूपाने प्रसिद्ध केल्या आहेत. 'वारधर्मदर्पण' हें त्यांचें भाषान्तरित नाटकहि इ. स. १९३२ सालीं प्रसिद्ध झालेलें

अनुक्रमणिका

आहे. ' मानाजीराव ' हें एक स्वतंत्र नाटकहि त्यांनी लिहिलेलें असून, ' उत्तररामचरित ' या त्यांच्या भाषान्तरित नाटकाप्रमाणेच तेंहि अप्रसिद्ध आहे.

काव्य व नाटकांप्रमाणेच त्यांनी चर्चात्मक व टीकात्मक असे अनेक प्रदीर्घ लेख लिहिलेले आहेत. ' शाकुन्तलसौन्दर्य ' हा त्यांचा चर्चात्मक प्रबंध १९३६ सालीं प्रसिद्ध झालेला आहे. शिवाय श्री. सरवटे यांच्या ' मराठी साहित्य समालोचना ' चा परिचय व ' मध्य-भारतीय मराठी वाङ्मय ' या पुस्तकाला प्रस्तावनाहि त्यांनी लिहिलेली आहे. या सर्व लेखां-मधून त्यांची रसिकवृत्तिच प्रामुख्याने आढळून येते

साहित्य-निर्मितीप्रमाणेच त्यांनी इंदूर येथे साहित्यविषयक कार्यालाहि प्रामुख्याने चालना दिली. इंदूर साहित्य सभेचे ते एक मूळ पुरुष होते. त्याचप्रमाणे इ. स. १९३५ सालीं इंदूर येथे भरलेल्या साहित्य संमेलनाचे ते एक चिटणीस व तदंतर्गत साहित्य-शाखेचे अध्यक्ष होते. रहाळकरांच्या निधनाने जुन्या पिढींतील व केशवसुत-संप्रदायांतील कवि व इंदूर येथील एक साहित्यप्रेमी रसिक विद्वान् नाहीसा झाला आहे.

## कै. केशव भिकाजी ढवळे

मुंबईतील सुप्रसिद्ध केशव भिकाजी ढवळे प्रकाशन-संस्थेचे एक संस्थापक व मालक श्री. केशव भिकाजी ढवळे यांना १ डिसेंबर १९५७ रोजीं ' समर्थ सदन ' या त्यांच्या राहत्या घरीं देवाज्ञा झाली ! मृत्युसमयीं त्यांचें वय ७२ वर्षांचें होतें.

नोकरी करण्यापेक्षा स्वतंत्र धंदा करण्याची मनःप्रवृत्ति व ईर्षा असलेली जी कांहीं त्या काळीं मूठभर महाराष्ट्रीय मंडळी होती त्या वर्गांतीलच कै. केशवरावजी हे होते. शाळेंतील शिक्षकाची नोकरी सोडून पाठीवर पुस्तकें बांधून गांवोगांवीं विकण्याची प्रथा त्यांच्या वडील बंधूंनी अगोदरच सुरू केली होती. शालेय व धार्मिक पुस्तकें विकण्याचा तोच धंदा माधव-बागेंत दुकान थाटून केशवरावजींनी सुरू केला. निरलस परिश्रम, निरहंकारी वृत्ति, गोड भाषा, सचोटीचा व्यवहार, स्वागतशील वृत्ति व प्रेमळ वागणूक या गुणांमुळे केशवरावजींनी पुस्तक-विक्रीचा धंदा भरभराटीस आणला. याच काळांत त्यांचे कनिष्ठ बंधु कै. गणपतराव हे त्यांना येऊन मिळाले व त्यांच्या सहकार्याने किंबहुना त्यांच्या प्रेरणेने त्यांनी धार्मिक व लहान मुलांसाठी पुस्तकें प्रसिद्ध करण्यास सुरुवात केली. वाचकांची नाडी ओळखून पुस्तकें प्रसिद्ध करण्याची दृष्टि व प्रकाशनांतील धाडस यांमुळे धंद्याला ऊर्जिता-वस्था येण्यास फार विलंब लागला नाही. प्रकाशनाचें व पुस्तकविक्रीचें कार्य गणपतराव यथायोग्य करीत असल्याचें पाहून केशवराव जवळजवळ पुढे निवृत्तच झाले. पोटदुखीचा रोग असल्यामुळे फार दगदग झेपणें शक्य नाही हेंहि ओळखून त्यांनी निवृत्त होण्याचें ठरविलें असावें. गेलीं जवळजवळ पंचवीस वर्षें ते निवृत्तच होते. गणपतराव अकालीं व अकस्मात् निवर्तल्यामुळे प्रकाशन व पुस्तकविक्री यांची सर्व जबाबदारी गणपतरावांचे चिरंजीव श्री. बा. ग. ऊर्फ सोन्याबापू ढवळे यांच्यावर कांहीशा अल्पवयांतच पडली व त्यांनी आपल्या उमेदीने व धाडसाने धंद्याचा व्याप आता फारच वाढविला आहे. कर्नाटक छापखाना व केशव भिकाजी ढवळे प्रकाशन या दोन्ही संस्था त्यांच्या मालकीच्या असून त्या संस्थांचा विकास केशवरावजींनी आपल्या डोळ्यांदेखत पाहिला हें त्यांचें भाग्यच म्हटलें पाहिजे. कै. केशवरावजींच्या निधनाने प्रकाशनक्षेत्रांतील एक निरहंकारी, स्वागतशील, प्रसिद्धिपराङ्मुख व गोड्या स्वभावाची व्यक्ति नाहीशी झाली आहे. ● ● ●

वा. रा. ढवळे

कै. प्रा. श्री. म. ऊर्फ बापुसाहेब माटे



जन्म : २-८-१८८६ मृत्यु : २५-१२-५७












डॉ. के. ना. वाटवे

# कै. बापुसाहेब माटे

बापुसाहेबांचा आणि माझा प्रत्यक्ष परिचय झाला तो १९१९ सालीं न्यू इंग्लिश स्कूलमध्ये. बापुसाहेब त्या संस्थेंत आधीच शिक्षक म्हणून होते; आणि मी नुकताच बी. ए. होऊन हंगामी शिक्षक म्हणून तेथे लागलों होतों. माझ्या तेथील अल्पशा वास्तव्यांत माझ्या मनावर खोल संस्कार केले ते तीन शिक्षकांनी. वरच्या वर्गांना इंग्रजी शिकविणारे श्री. म. माटे आणि संस्कृत शिकविणारे म. पां. ओक व गो. कृ. मोडक. पुढे माटे १९२० मध्ये न्यू इंग्लिश स्कूल सोडून नूतन मराठी विद्यालयांत आले; आणि मीहि एम्. ए. होऊन १९२३ च्या जूनमध्ये शिक्षक म्हणून तेथेच दाखल झालों. या ठिकाणीं ते व मी शिक्षक म्हणून अकरा वर्षे व सर परशुरामभाऊ कॉलेजांत मराठीचे प्राध्यापक म्हणून अकरा वर्षे अशीं बावीस वर्षे सहाध्यापन केलें. त्यानंतर निकटचे स्नेही म्हणून त्यांच्या अंतापर्यंत आम्ही अधूनमधून एकत्र येत असूंच. याप्रमाणे आमच्या ३७–३८ वर्षांच्या दृढ परिचयाच्या कालांत बापुसाहेबांच्या ठाशीव व्यक्तिमत्त्वाचे आणि भरीव कार्याचे जे ठसे माझ्या मनावर उमटले आहेत त्यांचें छोटेसें शब्दचित्र–माझ्या ज्येष्ठ व्यवसायबंधूला श्रध्दांजलि वाहण्याच्या निमित्ताने–म. सा. पत्रिकेच्या वाचकांसाठी मीं रेखाटीत आहें.

बापुसाहेबांनी शिक्षकाचा पेशा पत्करून न्यू इंग्लिश स्कूलमध्ये इंग्रजी विषयाचे नामांकित अध्यापक म्हणून लौकिक संपादन केला व नूतन मराठींतहि तोच आपला लौकिक कायम राखला. पुण्यामध्ये माटयांचा खाजगी इंग्रजीचा वर्गहि एका स्वतंत्र संस्थेचें रूप धारण करून बहुत वर्षे चालू होता व इंग्रजीचे अध्यापक म्हणून केवळ पुण्यांतच नव्हे तर पुण्याबाहेरहि त्यांचें नांव गाजत होतें. तथापि इंग्रजीचे एक कुशल शिक्षक असें त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचें आणि कार्याचें एकेरी स्वरूप कधींहि नव्हतें. माटयांच्या संस्कारक्षम विद्यार्थिजीवनावर महाराष्ट्रांतील तत्कालीन राजकीय, सामाजिक आणि धार्मिक आंदोलनांनी जे संस्कार उमटविले होते, त्यांतून त्यांच्या मनाची एक विशिष्ट घडण बनली होती. १९१९ सालीं तर ती घडण चांगलीच बळकट झाली होती. महाराष्ट्रांत होऊं घातलेल्या क्रान्तीमध्ये नव्या धर्तीवर होणाऱ्या सामाजिक बांधणीने त्यांचें मन व्यग्र करून टाकलें होतें. अस्पृश्यता-निवारण या त्यांतल्या एका कार्याने तर त्यांचें मन संपूर्ण वेधून घेतलें होतें व त्या अनुषंगाने हिंदुधर्म, जुनें नवें मराठी वाङ्मय, सामाजिक विषयांवरील पाश्चात्त्यांचे विचार इत्यादि अनेक बाबी त्यांच्या सखोल अभ्यासाचा विषय बनल्या होत्या. म्हणून मीं पाहिलेले शिक्षक माटे (किंवा माटे मास्तर) हे नुसते एकेरी मास्तर नसून एक सखोल आणि तळमळीचे स्वतंत्र विचारवंत समाजशास्त्राभ्यासी होते. शिक्षकी पेशाने त्यांच्या समाजशास्त्रविचाराच्या छंदाला आधार दिला आणि सामाजिक विचाराच्या छंदाने आणि प्रत्यक्ष सामाजिक कार्याने त्यांच्या शिक्षकी पेशाला उठाव दिला. हा अन्योन्याश्रय वगळून माटयांच्या अध्यापन-कार्याचें मूल्यमापन करतां येणार नाही.

तर्कनिष्ठ विचारसरणी हा माटयांच्या मनोघटनेचा महत्त्वाचा विशेष असला तरी भावनात्मकता व कल्पकपणा यांचा आवश्यक तो अंश त्यांच्यामध्ये होता. त्यामुळे इंग्रजी व मराठी शिकवितांना त्यांच्या ठायीं मूळ लेखकाच्या मनाशीं तादात्म्य पावण्याची वृत्ति दिसत

अनुक्रमणिका

असे. ही रसिकता, अध्यापनकौशल्य आणि इंग्रजी व मराठी भाषेंतील त्यांचें वक्तृत्व यांमुळे त्यांचें अध्यापन परिणामकारक होई. पण माटयांच्या खास अध्यापनाला जो स्वतंत्र जिव्हाळा येत असे तो त्यांच्या समाजशास्त्रावरील व्यासंगाने आणि समाजाच्या प्रत्यक्ष अवलोकनाने. सामाजिक समतेचें तत्त्वज्ञान माटयांना विचाराने पटलें असल्यामुळे जेथे जेथे धार्मिक, सामाजिक किंवा राजकीय अन्यायाने विषमता उत्पन्न होई, दारिद्र्य जेथे पराक्रमाला पायबंद घाली, अथवा जेथे जेथे कोणाची अन्याय्य अडवणूक होई तेथे तेथे त्यांचें मन कैवाराची उसळी घेई. काव्यांतला किंवा कादंबरींतला अशा प्रकारचा कोणताहि प्रसंग ते मोठ्या तळमळीने मांडीत; इतकेंच नव्हे तर, या प्रकाराच्या मागे असणारें समाजरचनेचें सर्व तत्त्वज्ञान विद्यार्थ्यांना समजावून सांगत आणि प्रत्यक्ष-अप्रत्यक्षपणें विद्यार्थ्यांना समाजकार्याची प्रेरणाहि देत. ज्ञानेश्वर, नामदेव, एकनाथ आणि तुकाराम यांच्या पारमार्थिक औदार्याचा आणि समर्थांच्या प्रपंचविज्ञानाचा त्यांच्या मनावर खोल ठसा उमटला होता. तो त्यांच्या समाजविचाराला प्रेरक ठरे व ही प्रेरणा त्यांच्या अध्यापनांत प्रतीत होई. मग अध्यापनाचें शास्त्र, अध्यापनाची शिस्त आणि त्याची परीक्षानिष्ठ दृष्टि या कसोट्या लावून माटयांच्या शिकवण्याचें मापन कोणी कसेंहि करो !

अध्यापकांमध्ये दोन प्रकार असतात. एक शुद्ध विद्येचे उपासक व दुसरे स्वतंत्र विचाराचे व आचाराचे प्रवर्तक. या प्रकारांत बरावाईट असें तारतम्य मला येथे करावयाचें नाही. तथापि 'यः क्रियावान् स पण्डितः' या न्यायाने माटयांची गणना दुसऱ्या प्रकारांत करतां येईल. माटयांचा मनाचा मूळ पिंड स्वतंत्र विचाराचा आणि क्रियाशीलतेचा. त्यामुळे शिक्षकाचा पेशा त्यांना जमत असला तरी मानवत नव्हता. निर्वाहाचें साधन म्हणून शिक्षकी, व छंद म्हणून सामाजिक कार्य अशी त्यांची द्विधा स्थिति झालेली होती. त्यामुळे शाळेंत किंवा कॉलेजांत त्या त्या अध्यापन-संस्थेच्या संपूर्ण जीवनाशीं ते फारसे समरस झाले नाहीत. ते आपल्या आत्मचरित्रांत यासंबंधी पुढीलप्रमाणे उद्गार काढतात. "शाळेच्या अधिकाऱ्यांनी काढलेल्या कोणत्याहि योजनेंत मी दाखल झालों नाही...... ५।६ तास जें शिकवावयाचें काम असे तेवढें केलें म्हणजे आपलें काम संपलें. संस्थेच्या इतर उठाठेवी करण्याचें आपल्याला कारण नाही असेंच मी धरून चाललों." त्यांचें मन दुसरीकडे लागलेलें होतें. तें करण्यास वर्तमानपत्राचें संपादन हें अधिक उपयुक्त ठरलें असतें. किंवा चरितार्थाची स्वतंत्र सोय स्वतःच्या बळावर करण्याइतकी संपत्ति त्यांच्याजवळ असावयास पाहिजे होती. परंतु महाराष्ट्राच्या बुद्धिजीवी लोकांना निर्धनता हा शाप असल्याने त्यांच्या सार्वजनिक कार्यांत वर सांगितल्याप्रमाणें नेहमी अंतर्विरोध निर्माण होतो. हीच माटयांची अवस्था होती.

निर्वाहाचें एक साधन आणि सामाजिक कार्यांत विद्यार्थि-अनुयायांचें साहाय्य या दोन गोष्टी शिक्षकी पेशाने बापुसाहेबांना दिल्या हें खरें; तथापि हाच शिक्षकी पेशा त्यांना अनेक प्रकारें नडला. ज्या सामाजिक विचारांचा ते उच्चार आणि आचार करीत त्या विचार-आचारांना शिक्षकाचा दर्जा थिटा पडे. 'तुम्ही करतां तें काम करायला तुमच्यापेक्षा मोठा माणूस पाहिजे' असें कांही लोक त्यांच्या तोंडावर बोलत; व या गोष्टीची दुःखद जाणीव माटयांनाहि असे. पण कॉलेजांत आल्यावर ही अडचण थोडी दूर झाली म्हणून बापुसाहेब खुशींत असत. मात्र या वेळीं त्यांच्या सार्वजनिक कार्याचा जोष ओसरला होता.

साहित्यसेवा हें माटयांच्या कार्याचें एक महत्त्वाचें अंग आहे. शास्त्रीय व ललित अशा दोन प्रकारचें त्यांचें साहित्य आहे. शास्त्रीय वाङ्मयांत "अस्पृश्यांचा प्रश्न," "पंचमानव समाज," "विज्ञानबोधाची प्रस्तावना," "हिंदुसमाजदर्शन," "गीतातत्त्वविमर्श" इत्यादि

ग्रंथांचा समावेश होतो. हे ग्रंथ समाजशास्त्रावरील ( व तत्त्वज्ञानावरील ) असून त्यांत माट्यांचा व्यासंग, विद्वत्ता आणि विवेचकपणा दिसून येतो. माटे हे संघटनाकुशल असल्याने इतर अनेक लहानमोठ्या लेखकांचें साहाय्य घेऊन त्यांनी पुढील ग्रंथांचें संपादन केलें. "केसरीप्रबोध," "केळकर ग्रंथ," "विज्ञानबोध," "सांवत्सरिक." "पाश्चात्य पुरुषश्रेष्ठ," "बारा शास्त्रज्ञ," "जगाचे प्रवासी" इत्यादि त्यांचे कांही ग्रंथ चरित्रात्मक आहेत. प्रथम सामाजिक कार्य सुरू केल्यानंतर बऱ्याच उशिराने त्यांनी ग्रंथरचना हातीं घेतली. व ललितवाङ्मय तर अगदी शेवटल्या काळांत लिहिलें. "ललितवाङ्मयलेखनाची तुमची भाग्यरेषा फार उशिरा उमटली" असें आम्ही त्यांस विनोदाने म्हणत असूं. ललित लिखाणाला लागणाऱ्या भावनात्मकता व कल्पना-शक्ति या दोन गोष्टी त्यांच्या मनःकोशांत पूर्वीपासून सुप्तावस्थेंत होत्या, त्या त्यांनी पुढे एकदम प्रकट केल्या. "उपेक्षितांचें अंतरंग" व त्यांच्या इतर लघुकथा, "पश्चिमेकडील वारा" ही कादंबरी; व कांही ललित निबंध असें माट्यांचें ललित वाङ्मय आहे. वैचारिक बैठक आणि समाजशास्त्राचा व्यासंग हे माट्यांच्या लेखनाचे दोन ठळक विशेष असल्याने ललितवाङ्मयांतहि तेच प्राधान्य पावले. त्यांच्या परिपोषाला त्यांनी आपली कलात्मकता शक्य तितक्या बहादुरीने वापरली आहे. त्यामुळे त्यांच्या ललितवाङ्मयालाहि थोडेसें सामाजिक शिकवणीचें स्वरूप प्राप्त झालें आहे. एकंदरीने विचार करतां माट्यांची साहित्यसेवा ही पृष्ठसंख्येने व गुणाने चांगली भरीव असून तिने त्यांना महाराष्ट्रांतील एक थोर साहित्यिक हा दर्जा प्राप्त करून दिला आहे. माट्यांची साहित्यसेवा, त्यांच्या विशिष्ट शैलीबद्दल एकदोन शब्द लिहिल्याशिवाय, पुरी वर्णून झाली असें होणार नाही. विद्यमान मराठी शैलीकारांत माट्यांचें एक विशिष्ट स्थान आहे.

सर्वसामान्य व्यवहारांत नेहमीं वापरले जाणारे अनगड शब्द आपल्या लिखाणांत माटे आवर्जून वापरीत. 'समाजाची बलाबल', 'विचारवंतांचा आंचका', 'अंगासरसा संसार', 'सुशिक्षितांची टावकी', 'चिणचीण' हीं त्यांच्या विशिष्ट शब्दयोजनेचीं उदाहरणें होत. शिवाय 'विचाराचें स्तबक', 'ज्ञानें आणि विज्ञानें', 'ही भूमि', 'वैचारिक गुंजारव' इत्यादि शब्द त्यांच्या लिखाणांत हटकून येत. 'शैली म्हणजे लेखक' या न्यायाने माटे यांच्या लेखनशैलींत व वक्तृत्वांत त्यांचें संपूर्ण व्यक्तिमत्त्व प्रकट होत असे. माटे यांच्या स्वभावांतच तीक्ष्ण आणि मृदु, ऋजु आणि वक्र, भावनात्मक आणि तार्किक, उघड आणि प्रच्छन्न, उदार आणि व्यवहारी, धीट आणि सावध अशा अनेक परस्परविरोधी द्वंद्वांचें सुंदर मिश्रण झालेलें होतें. त्यांतील जरूर त्या त्या अंशांचा ते व्यक्ति व प्रसंग पाहून मोठ्या हिकमतीने वापर करीत. त्यामुळे त्यांची शैली प्रसंगपरत्वें रसाळ, छद्मी, कल्पक, पांडित्यपूर्ण, साधीसुधी, भेदक किंवा पोटांत शिरणारी झाली आहे. त्यांच्या विशाल आणि भव्य शरीराप्रमाणे त्यांचें विस्तृत वाचन आणि त्यांच्या विचाराचा व्याप वाचकांचा आणि श्रोत्यांचा एकदम कबजा घेई. त्यांच्या लेखनांत आणि वक्तृत्वांत रंजकतेबरोबरच मन वळविण्याचा मोठा गुण होता. 'माटे सांगतात तेंच बरोबर' असें वाचकांस व श्रोत्यांस हटकून वाटे. त्यांची भाषा इतकी घरगुती आणि पोटरिघी व डोळे इतके बोलके होते की ऐकणाऱ्यांच्या न कळत ते त्यांच्या मनाचा ताबा घेत. अशा वक्तृत्वाने आणि लेखनानेच माट्यांनी अस्पृश्यतानिवारणाचें अवघड व नाजूक प्रकरण महाराष्ट्रांतील प्रतिकूल मंडळींच्या गळीं उतरविलें, चैतन्यवादाविरुद्ध जडवादी भौतिक शास्त्रांची तरफदारी केली आणि मोक्षविचाराला व्यवहारोन्मुख करण्याचा यत्न केला.

प्रा. बापुसाहेबांच्या विचार–उच्चार–आचारांतून प्रकट होणारें त्यांचें व्यक्तिमत्त्व मोठें ठाशीव आणि मनोज्ञ होतें. त्यांचें मन मुळांत मानी आणि पिळदार. बालपण आणि

विद्यार्थिदशा यांतील दारिद्र्याच्या चटक्यांनी त्याला चांगली धार आली; आणि पुढील आयुष्यांतील यशाने तें जयिष्णु आणि आक्रमक बनलें. विलक्षण आत्मविश्वास, कार्याची धडाडी, निर्भयपणा आणि तीव्र स्वाभिमान या गुणांमुळे त्यांनी मोठीं कार्यें उभारलीं आणि पार पाडलीं; आणि आपल्या कर्तृत्वानेच त्यांनी समाजाचें मन आकर्षित केलें. पण त्यांचा स्वाभिमान पुढे पुढे इतका कडवा बनला की तो त्यांना नकळत अहंकाराच्या सीमा स्पर्शूं लागला. त्यांचा स्वमताचा आग्रह हा परमताच्या अवहेलनेंत पर्यवसान पावूं लागला व त्याचा परिणाम त्यांचे अनेकांशीं संघर्ष होण्यांत झाला. आपल्या मताच्या अभिनिवेशांत ते थोर–थोरांनाहि जुमानीत नसत; आणि मतभेदाच्या प्रसंगीं कोणासहि टाफरून बोलण्यास कचरत नसत. याची जबर किंमत त्यांना द्यावी लागली. पण ती त्यांनी स्वाभिमानरक्षणार्थ खुशीने दिली. या त्यांच्या कडव्या वृत्तीला दुसरी एक मृदु बाजू होती. कार्याची तळमळ, स्वदेश व स्वधर्म यांचें प्रेम, रसिक आणि उदार समाजमनस्कता इत्यादि गोष्टींनी त्यांच्या कडव्या वृत्तीला मृदुत्व आणलें होतें. आपल्या अभिजात रसिकतेने, विद्वत्तेने आणि तळमळीने त्यांनी असंख्य विद्यार्थ्यांचीं मनें जिंकलीं आणि अनेक थोरांच्या अन्तःकरणांत प्रवेश केला. त्यामुळेच या कडव्या स्वाभिमानी आणि स्वयंकेंद्रित विद्वानाला अनेक सामाजिक आणि वाङ्मयात्मक संघटना उभारतां आल्या. ते विद्यार्थ्यांशीं वात्सल्याने, मित्रांशीं सौहार्दाने आणि थोरांशीं आदराने वागत. पण हें सर्व करतांना ते नेहमी स्वाभिमानरक्षणाला जागरूक असत. ही एक तारेवरची कसरत होती. पण माट्यांच्या कर्तृत्वाची अशी एक नवलाई होती की, ही कसरत करतां करतां त्यांनी साहित्यपरिषदेला सोळा–सतरा हजारांच्या देणग्या मिळवून दिल्या, मराठी वाङ्मयेतिहासाच्या रचनेचा मांड मांडला, समाज–विचार–मंडळ चालविलें, सामुदायिक ग्रंथसंपादन केलें, अस्पृश्यतानिवारणाची मोहीम चालविली, हिंदुत्वाचा कैंपक्ष घेतला, आणि असंख्य विद्यार्थ्यांचा व सुहृदांचा मोठा लोभ संपादिला. " मला तुम्ही दूर लोटा; पण आपल्या दोघांना एकमेकांवाचून करमायचें नाही आणि माझ्यावाचून तुमचें निभावयाचें नाही " असेंच कांही तरी कर्तृत्ववान् माटे म्हणत असावेसें नेहमी वाटे ! याचा स्पष्ट अर्थ हा की, माट्यांच्या स्वभावदोषांहून त्यांचें कर्तृत्व प्रभावी ठरे आणि महाराष्ट्रांतील जाणते त्या कर्तृत्वाचीच बूज समजूतदारपणें राखीत.

असो; ज्या झुंजार वृत्तीने माट्यांनी आपलें संपन्न जीवन व्यतीत केलें त्याच झुंजार वृत्तीने त्यांनी आज दीडदोन वर्षे मृत्यूशीं सामना चालूं ठेवला होता. मृत्यूचे पाश त्यांच्या भोवती आवळले जात असतांहि त्यांचें लेखनकार्य सुरूच होतें. अखेर या झुंजींत मृत्यूने सरशी केली आणि बापुसाहेबांना आमच्यांतून नेलें. वयाच्या ७१ व्या वर्षी झालेला बापुसाहेबांचा मृत्यु हा अपमृत्यु म्हणतां येणार नाही हें खरें आहे; तथापि बापुसाहेबांचें व्यक्तिमत्त्व व कार्य इतकें लोभस होतें की ते आमच्यामध्ये आणखी कांही वर्षे तरी राहावेत असें आम्हां सर्वांस वाटत होतें. पण मृत्यूने आमची ही मनीषा मानली नाही आणि महाराष्ट्र एका थोर साहित्यिकाला, सामाजिक कार्यकर्त्याला, विचारवंताला, प्रभावी वक्त्याला, माणुसकीच्या मूर्तिमंत गंहिवराला, मार्गदर्शक गुरूला आणि रसिक सन्मित्राला आचवला. बापुसाहेब माटे ही एक संस्थारूप व्यक्ति होती. तिची जागा भरून निघणें कठीण. तथापि अशा व्यक्तीच्या सत्प्रेरणांनी प्रबुद्ध होऊन त्यांच्या सामाजिक कार्याची ज्योत तेवत ठेवणें हेंच बापुसाहेबांचें ऋण फेडण्याचें एकमेव साधन महाराष्ट्रांतील तरुण पिढीच्या हातीं आहे. तें ऋण तरुण पिढीकडून फेडलें जाईल असा विश्वास व्यक्त करून ही श्रद्धांजलि बापुसाहेबांस अर्पण करतों. ● ● ●

श्री. वसंत स. जोशी, एम. ए.

# श्रीएकनाथकृत 'भावार्थ रामायणां'तील 'चंद्रसेनाख्याना'चा अप्रसिद्ध अध्याय

संतकवि श्रीएकनाथ यांच्या 'भावार्थ रामायण' या श्रेष्ठ काव्यग्रंथाने जशी मराठी साहित्यांत बहुमोल भर घातली आहे, त्याचप्रमाणे त्यांतील कांही भागांच्या अपुरेपणामुळे त्याच्या कर्त्यांबद्दल तर्कवितर्कास जागा राहून गेली आहे. 'भावार्थ रामायणा'च्या युद्ध-कांडाचे ४४ अध्याय लिहिल्यानंतर एकनाथांनी समाधि घेतली व नंतरचा युद्धकांडाचा भाग व उत्तरकांड 'गावबा' नांवाच्या त्यांच्या शिष्याने पूर्ण केलें, अशी आख्यायिका ऐकावयास मिळते. एकनाथांच्या 'भावार्थ रामायणा'चें उत्तरकांड बऱ्याच जणांनी लिहिलें असावें. आजपर्यंत गावबाचें उत्तरकांड प्रसिद्ध होऊन त्याचेंच सर्वत्र वाचन चाललेलें दिसतें. त्याचप्रमाणे कवि मुक्तेश्वराचें उत्तरकांड मला उपलब्ध झालें असून, प्रा. पां. ना. कुलकर्णी यांनाहि एक अप्रसिद्ध उत्तरकांड मिळालें आहे; पण त्याचा कर्ता कोण तें समजत नाही. या सर्वांनी आपली रचना 'एका जनार्दना शरण' या नांवानेच केलेली दिसते.

या उत्तरकांडाप्रमाणेच युद्धकांडाचा ५४ वा अहिरावणवध व चंद्रसेनाख्यानाचा अध्यायदेखील आख्यायिकानुसार गावबाचा असावयास हवा होता; परंतु तो 'जयराम-सुत' नांवाच्या कुणा एका कवीने लिहिल्याचें दिसून येतें. आपल्या लेखनाचें कारण सांगतांना तो म्हणतो, 'एकनाथी रामायण । केले सप्तकांड कथन । त्यांत अहिरावणाख्यान । काय म्हणोन विसरले ॥ ३३३ ॥ ऐसें न वदावें उत्तर । ते तंव विष्णूचा अवतार । त्यांसी स्वप्नीं नाही विसर । महाचतुर ग्रंथकर्ते ॥ ३३४ ॥' एकनाथांचा श्रेष्ठपणा अशा प्रकारें सांगून तो म्हणतो, 'परंतु झाले बहुत दिवस । मुखीं पाळितां ग्रंथास । गहाळिलें ह्या अध्यायास । तिहीं तयास काय कीजे' ॥ ३३५ ॥ असें कारण दिल्यानंतर स्वतःच्या नांवाचा उल्लेख करून 'मग साक्षेपें जयरामसुतें । करोनि घातलें अध्यायातें ।' ही एकनाथांचीच कृपा होय असें तो म्हणतो.

**अप्रसिद्ध चंद्रसेनाख्यान :**

यावरून मूळ हस्तलिखितांतील अहिरावण किंवा चंद्रसेनाख्यानाचा अध्याय गहाळ झाला व तो 'भावार्थ रामायण' छापून प्रसिद्ध करणाऱ्यांनाहि आजपर्यंत उपलब्ध झाला नाही, हें स्पष्ट होतें. एकनाथी वाङ्मयाचा अभ्यास करीत असतांना 'भावार्थ रामायणाची' एक संपूर्ण हस्तलिखित प्रत संकेश्वरचे एक प्रतिष्ठित नागरिक श्री. नारायण दामोदर ऊर्फ नानासाहेब कुलकर्णी यांच्याकडे असलेली, संकेश्वर येथील माझे जिव्हाळ्याचे हितचिंतक सुहृद श्री. धोंडोपंत नाईक व लोकप्रिय डॉ. बापूसाहेब जोशी, यांच्या प्रयत्नाने मला मिळाली. श्री. नानासाहेब कुलकर्णी यांनीहि अतिशय आपुलकीने व संतवाङ्मयाचा अभ्यास व्हावा या सदिच्छेने ती प्रत माझ्या स्वाधीन केली. श्री. नानासाहेब कुलकर्णी यांचे वडील कै. श्री.

दामूअण्णा कुलकर्णी हे अत्यंत रसिक असे गृहस्थ होते. संगीताच्या प्रांतांत ते दर्दी समजले जात व त्यांच्याकडे ख्यातनाम गवई गायन करण्यास येत असत. वारकरी संप्रदायांतील अलीकडील प्रसिद्ध साधुपुरुष वैकुंठवासी भाऊसाहेब काटकर हे त्यांच्या घरीं मुक्कामास असत व परमार्थविषयक प्रवचनहि ते करीत असत. श्री. भाऊसाहेब काटकर यांचा निधन-कालसुद्धा त्यांच्याच वाड्यांत झाला. अशा परंपरेंतील घराण्यांत हें हस्तलिखित मिळाल्याने त्याचें विशेष महत्त्व आहे. या हस्तलिखितामध्ये ५३ वा अध्याय अहिरावण किंवा चंद्रसेना-ख्यानाचा असून तो छापील प्रतींतील जयरामसुताच्या अध्यायापेक्षा अगदी वेगळा आहे.

युद्धकांडांत हा अध्याय असून त्याच्या अखेरीस प्रतलेखकाने स्वतःचें नांव व लेखन-कालहि दिलेला आहे. तो मजकूर पुढीलप्रमाणे आहे. 'शके १७६१ विकारीनाम संवत्सर दक्षिणायण हेमंतऋतु आस्वीन मासे कृष्णपक्षे रवीवासरे तद्दिने रवीवंशोद्भव श्रीरामकथा व्याख्यान येकनाथ कवेंद्रकृत प्राकृतभाषाकार श्री भावार्थ रामायण ग्रंथ समाप्त ।। लेखन सेवट यशवंत हसूरकर कुलकर्णी हा ग्रंथ पांडबा वीरूपाक्ष माणगांवकर याचा असे. ग्रंथ रक्षण करावा. पारायण करावें. सकल मनोरथ पूर्ण श्रीराम करील. ।। श्रीसितारामार्पणमस्तु ।।' या स्पष्ट उल्लेखावरून ह्या हस्तलिखिताचें लेखन सुमारें ११८ वर्षांपूर्वी झाल्याचें दिसून येतें.

या अप्रसिद्ध अध्यायांतील पूर्ण ओवीसंख्या १६८ असून शेवटची १६९ वी ओवीहि अपूर्ण राहिलेली आहे. 'एका जनार्दना शरण' हा चरणहि आलेला नाही; परंतु कथानक पूर्ण झालें असून अजून एक-दोन ओव्या राहिल्या असाव्यात हें त्यासाठी सोडलेल्या कोऱ्या जागेवरून ताडतां येतें. पोथीसाठी वापरलेल्या कागदावरील वॉटरमार्कमध्ये पुढील मजकूर दिसतो. CLARKE & CO. 1835. यावरून पोथीचा कागद अव्ययावत् आहे परंतु प्रत करीत असतांना पुढे असलेल्या पोथीचा कागद चांगला न राहिल्याने किंवा इतर कांही कारणामुळे प्रतलेखकास हा अध्याय पूर्ण करणाऱ्या ओव्या लिहितां आल्या नसाव्यात, असें वाटतें. कारण इतरत्र कुठेहि अशी अपूर्णता दिसून येत नाही. हस्तलिखिताच्या प्रत्येक पानांत सरासरी २२ ओळी आहेत. अक्षर स्पष्ट व सुरेख असें आहे.

हा मला उपलब्ध झालेल्या 'भावार्थ रामायणा'च्या प्रतींतील अध्याय हाच अधि-कृत असा अहिरावणाख्यान किंवा चंद्रसेनाख्यानाचा अध्याय आहे, असें मला वाटतें आणि त्या दृष्टीने त्याला उपोद्बलक अशा कांही गोष्टी या लेखांत मी मांडीत आहे.

**कथानकाचें मूळ (Source) :**

चंद्रसेनाख्यानाचा जो भाग या प्रसिद्ध व अप्रसिद्ध अशा दोनहि अध्यायांतून आला आहे त्याचें मूळ निराळेंच असलें पाहिजे. श्रीवाल्मीकीरामायण, श्रीमदध्यात्म-रामायण किंवा गोस्वामी तुलसीदासकृत 'रामचरितमानस' इत्यादि ग्रंथांतून या आख्या-नाचा आढळ होत नाही. नाझरेकर कवि श्रीधर याच्या 'रामविजय' या लोकप्रिय ग्रंथाच्या ३१ व्या अध्यायांत मात्र लोकरूढ असलेलें सर्व कथानक आलेलें आहे. श्रीएकनाथांचें 'भावार्थरामायण' व श्रीधराचे 'रामविजय', 'हरिविजय' आदि ग्रंथ लोकांच्या नित्य पठनांत आजहि आहेत. श्रीधराच्या 'रामविजय' ग्रंथांतील चंद्रसेनेच्या आख्यानाचा लोकां-तील प्रसार व एकनाथांच्या ग्रंथांतील त्याचा अभाव खटकल्यामुळेच जयरामसुत हा अध्याय लिहिण्यास उद्युक्त झाला असावा. 'रामविजय' हा ग्रंथ शके १६२५ त लिहिला गेला. जयरामसुताने आपला अध्याय शके १६२५ ते १६५० या दरम्यान केव्हा तरी लिहिला असावा असा माझा कयास आहे.

'भावार्थरामायण' हा अनेक कथोपकथांचा एक सुंदर गुच्छ आहे. भ्रमरवृत्तीने जिथून जिथून कथाविष्काराला पोषक असा भाग सापडेल तिथून तो मिळवून कुशलतेने मांडण्याचा एकनाथांचा परिपाठ होता. त्या दृष्टीने मुळांत नसलेलें परंतु कथानकाची रंगत वाढविणारें चंद्रसेनेचें आख्यान 'भावार्थ रामायणां'त येणें साहजिकच आहे. अहिमहिरावण-आख्यानाचा भाग घालण्यास एकनाथानंतरचा ग्रंथपूर्तिकार विसरला नव्हता, हें युद्ध-कांडाच्या ९२ व्या अध्यायांतील १७१ व्या ओवीवरून स्पष्ट होतें. युद्धकांड संपवितांना त्यांतील कांहीं अध्यायांतील महत्त्वाचा भाग कांहीं ओव्यांतून सांगितलेला आहे. १७१ वी ओवी अशी आहे—"पाताळासी जाउनी आपण। मारुनी अहिरावण महिरावण। मकर-ध्वजासी राज्य देउन। युद्धकांड संपविलें ॥" तेव्हा या ओवींत उल्लेख करण्याइतकें महत्त्व या आख्यानाला कवीने दिलें असून मुळांतहि त्याने तें सविस्तर वर्णिलेलें आहे. जयरामसुताने या आख्यानासंबंधी श्रोत्यांनी घेतलेल्या आक्षेपांस उत्तर देतांना त्याचा मूलाधार दिलेला आहे. ३३१ व्या ओवींत तो म्हणतो, 'परी प्रस्तुत अग्निपुराण। श्रोतीं पहावें शोधून। सेतुबंध माहात्म्यीं जाण। हें आख्यान सविस्तर।।' अशा तऱ्हेने अग्निपुराणांतील आख्यान घेऊन जयरामसुताने आपला अध्याय सजविलेला आहे. अप्रसिद्ध अध्यायांतील कथानकाचें मूळ पुढील मंदोदरी-आख्यानाच्या ओवींत देण्यांत आलें आहे. त्यांत म्हटलें आहे, 'अहिरावणादि चरित्र। सेतुमहात्मीं समग्र। लिहिलें असे सविस्तर। मंदोदरी आख्यान'॥१२१॥ यावरून हा अप्रसिद्ध अध्याय सेतुमाहात्म्यावरून लिहिण्यांत आल्याचें दिसून येतें.

### राम हेंचि परब्रह्म :

महाराष्ट्रामध्ये रामदासांच्या पूर्वी श्रीरामावताराचें महत्त्व प्रभावी वाणीने सांगणारे असे एकनाथच होऊन गेले. तत्पूर्वी कृष्ण आणि पांडुरंग या देवतांचीच उपासना मोठ्या प्रमाणावर चालू होती. माझ्या 'भावार्थ रामायणाची रचना' या लेखांत रामाचा आदर्श जनतेच्या डोळ्यांसमोर ठेवण्यांतील एकनाथांचा उद्देश विशद केलेलाच आहे; परंतु त्याचबरोबर एक-नाथांना राम हें परब्रह्म वाटत होतें व तशी त्यांची त्याच्या ठिकाणीं दृढानुरक्ति होती हेंहि आपण ध्यानांत घेतलें पाहिजे. सीता आणि राम म्हणजे जीव आणि शिव अशी त्यांची भावना होती. 'सीता क्रिया राम कर्ता।' असेंहि ते एके ठिकाणीं म्हणतात. अशा आपल्या परम-देवताबद्दल कोणीहि शंका घेतली तर तिचें अनेक प्रकारें निरसन करून श्रीरामाची श्रेष्ठता पट-विण्याचा ते आटोकाट प्रयत्न करतात. एकनाथांची ही श्रीरामविषयक भावना 'भावार्थ-रामायणा'च्या ग्रंथपूर्तिकारानेसुद्धा ध्यानांत घेतल्याचें पुढील ओवीवरून दिसून येतें. या ओवींत तो म्हणतो, 'राम सगुण तोचि निर्गुण। राम परमात्मा परिपूर्ण। चिन्मात्रैक चैतन्यघन। विश्व विश्राम' जाण श्रीराम ॥ ४० ॥' (युद्धकांड, अध्याय ८४).

### श्रीरामावरील आक्षेपांचें खंडन :

स्त्रीच्या सांगण्यावरून मायावी मृगापीठामागे जाणाऱ्या रामाबद्दल बाईलवेडेपणाचा आरोप श्रोत्यांकडून येऊं नये, म्हणून सीता ही निर्विकार भक्त आणि तिचें मनोगत जाणून (भक्ताचा) भावार्थ पुरविण्याकरितां तो मृगामागे धावला, असें समर्थन एकनाथांनी अरण्य-कांडाच्या १५ व्या अध्यायांत केलें आहे. (ओव्या ११८ ते १२५ पाहा.).

श्रीराम मृगाच्या पाठीमागे गेला. संरक्षणासाठी मागे राहिलेल्या लक्ष्मणास रामाच्या मदतीस जाण्यास सीता सांगते; परंतु स्वकर्तव्यपालनांत व्यत्यय येऊं नये, म्हणून लक्ष्मण तिकडे

जाण्यास सिद्ध होत नाही. तेव्हां सीता त्याला अत्यंत टाकून बोलते व तिच्याबद्दलच्या पापी भावनेने तो तिथे राहूं इच्छित आहे, असा कुत्सित आरोप करावयासहि ती मागेपुढे पाहत नाही. त्यामुळे मरणप्राय दुःख झालेला लक्ष्मण जावयास निघतो. लक्ष्मणाची सेवावृत्ति न जाणतां त्याला वाग्बाणांनी ताडन केल्याबद्दल श्रोते सीतेला दोष देतील, म्हणून एकनाथ लगेच तिच्या साहाय्यार्थ धावून येतात. अपशब्दांनी छळून रामाची अगाध कीर्ति वाढविण्याकरिता व रामाकडून रावणाचा वध होण्याकरिता सीतेने लक्ष्मणाला पाठविलें, असा खुलासा ते करतात (अरण्यकांड, अध्याय १५ पाहा.).

त्याचप्रमाणे श्रीरामाचा शोक, सीतेचा मोह, रामाची लंकेमध्ये सीतेला भेटण्याविषयी उदासीनता यासंबंधी श्रोते आक्षेप घेतील असें वाटतांच त्या त्या ठिकाणीं एकनाथांनी श्रीरामाचा कैपक्ष घेतल्याचें आढळतें. सीतेच्या वियोगाने विव्हळ होऊन राम आक्रोश करूं लागला. तेव्हा हा कामार्थी राम परब्रह्म कसा हें पाहण्यासाठी आलेल्या पार्वतीस रामाने दिलेलें उत्तर आरोपांचें खंडन व परमदैवताचें मंडन या थाटाचेंच आहे. त्या ठिकाणीं एकनाथांनी म्हटलें आहे—

रडणें पडणें स्वैर धांवणें । देखोनि जग पिसे म्हणे ।
श्रीराम विचरे ब्रह्मपणें । जग उद्धरणें श्रीरामा ॥ ११६ ॥
(अरण्यकांड, अध्याय २०.)

एकनाथांची हीच भूमिका नंतरच्या ग्रंथकाराने कायम ठेवल्याचें युद्धकांडाच्या ८४ व्या अध्यायांतहि दिसून येतें. वनवासाहून परत आल्यानंतर श्रीरामाने आपणांस मदत करणाऱ्या सर्वांची यथायोग्य संभावना केली.

येका जनार्दना शरण । जाली सकलांची गौरवण ।
सुग्रीव आणि बिभीषण । कपिसैन्य विसरला ॥ १६३ ॥
ऐसें न मनावें श्रोता । राम न विसरे सर्वथा ।
निजभक्तांची पूजा करितां । उल्हास चित्ता श्रीरामाच्या ॥ १६४ ॥

या ठिकाणींसुद्धा रामाच्या श्रेष्ठत्वास बाधा येऊं नये म्हणून त्याची बाजू समजावून सांगण्याचा आवेशच प्रामुख्याने प्रतीत होतो.

### अप्रसिद्ध चंद्रसेनाख्यानाचें वैशिष्ट्य :

वर दिलेल्या सर्व उल्लेखांवरून श्रीराम या दैवताबद्दलचा यथार्थ अभिमान एकनाथ व अप्रसिद्ध ग्रंथपूर्तिकार या दोघांनाहि होता हें कळून येण्यासारखें आहे. हीच गोष्ट या अप्रसिद्ध अध्यायांतसुद्धा आढळते. श्रीराम हा पुरुषोत्तम मानला जातो. राम एकवचनी, एकबाणी जसा होता, तसा तो एकपत्नीहि होता. त्याच्या एकपत्नीकत्वाविषयी कल्पनेंतहि स्खलनता दाखविणें हें खऱ्या रामभक्ताला सहन होण्यासारखें नव्हतें. ही भूमिका जयरामसुत समजूं शकला नाही. श्रीरामाचें एकपत्नीव्रत लक्षांत न घेतांच त्याने सारें चंद्रसेनाख्यान रंगविलें आहे. जयरामसुताच्या अध्यायांत हनुमंताने चंद्रसेनेला आश्वासन दिल्याप्रमाणे श्रीराम तिच्याकडे जातात व मंचकावर बसतांच तो भुंग्यांनी पूर्वीच पोखरून ठेवलेला असल्यामुळे कोसळतो असा भाग आला आहे. परंतु माझ्याकडील अप्रसिद्ध अध्यायांत हा भाग सर्वस्वीं वेगळा व श्रीरामाचें अलौकिक सामर्थ्य वर्णन करणारा असा आहे. ‘अहिमहिरावणां’चा वध होऊन, हनुमानपुत्र मकरध्वजाला गादीवर बसवून श्रीराम लंकेकडे निघाले, तेव्हा हनुमंताने त्यांना चंद्रसेनेच्या मागणीची आठवण दिली. रामांनी तिला बोलावून घेतलें. चंद्रसेनेने प्रत्यक्षांत

त्यांचें दर्शन घेतांच श्रीरामाच्या दृष्टींतील अमृताने परमामृताची वृष्टि होऊन परब्रह्म भेटल्या-सारखें तिला वाटलें. तिच्या मनांतील कामुकता तर कोठच्या कोठे पळाली आणि ती राम-नामाचा महिमा गाण्यांत दंग झाली.

हनुमान ह्मणे, ' चंद्रसेनेसी । स्वपत्नी करिती ऐसी । अंगसंग देवोनि प्रीतीसी । अति उल्हासी परिणावी ' ॥१५९॥ मग बोले रघुनाथ । 'एकपत्नीव्रत मज निश्चित । कैशेनि घडे अनप्राप्त । चंद्रसेनेलागुनी' ॥१६०॥ वचना गुंतला कपिराणा । चंद्रसेने लागुनी जाणा । ह्मसें आलें रघुनंदना । काय वचना बोलतु ॥१६१॥ राम ह्मणे अंजनीसुतासी । 'चंद्रसेनेसि आणि मजपासी । संपादीन तीच्या वचनासी । आपुल्या व्रतासि रक्षितो ॥१६२॥ त्वरें करोनि हनुमंतें । गजस्कंधीं बैसवोनि चंद्रसेनेतें । वाद्यें करोनि हर्षयुक्तें । आणि त्वरितें रामभेटी ॥१६३॥ समीप आलि चंद्रसेना । नेत्रीं न्याह्माळिला रामराणा । 'तृप्त जालें तुझ्या दर्शना । विषयकामना विसरालि ॥१६४॥ जरि मी धरितें विषयशक्ति । तरि तूं छळितासि भ्रमरानुवृत्ति । ऐसें कळोनि निश्चितीं । तूं माझा मूर्ती परमात्मा ॥१६५॥ सीद्धि पावलें तुझें एकपत्नीव्रत । सकळ फळले तुझे मनोरथ । द्वापारीं होवोनि कृष्णनाथ । देयी अर्धांग मजलागीं ' ॥ १६६ ॥ वचन मानिले रामासी । संतोषोनि बोले तियेसी । जैसे असे तुझे मानसीं । होयी निश्चयेसीं ममाज्ञा ॥१६७॥ चंद्रसेनेचे मस्तकीं ठेवोनि हस्त । तीसि केलें ध्यानस्त । अद्यापि पाहती लोक समस्त ॥ कन्याकुमारि ह्मणोनी ॥१६८॥

या ठिकाणीं चंद्रसेनेकडूनच श्रीरामाचें अनुभवसिद्ध श्रेष्ठत्व वर्णिलें असून श्रीरामाला असलेली एकपत्नीव्रताची जाणीवहि स्पष्टपणें दाखविलेली आहे. एकनाथांचा दृष्टिकोन यथार्थ-पणें मांडल्याचें श्रेय या अध्यायाच्या कर्त्यास देणें जरूरीचें आहे.

**स्थलविशेषवर्णन :**

कथानक सांगण्याच्या ओघांत निरनिराळ्या स्थलांची व्युत्पत्ति सांगून त्याचें नांव व वैशिष्ठ्य एकनाथ सांगतात. अशीं स्थळें ' भावार्थ रामायणां'त बरींच आहेत. या अप्रसिद्ध अध्यायांतहि हीच पद्धति स्वीकारण्यांत आलेली दिसते. कांही उदाहरणें पाहिल्यानंतर ही गोष्ट सहज लक्षांत येते.

सीतेच्या विरहाने शोकमग्न झालेल्या श्रीरामाचें खरें स्वरूप पाहण्यास आलेल्या पार्वतीस श्रीरामाने ' तू काई ! ' असा प्रश्न विचारला. तीच तुळजापूरची ' तुकाई ' ( भवानी ) असा उल्लेख अरण्यकांडाच्या २० व्या अध्यायांत आलेला आहे.

श्रीराम म्हणे तूं काई । तेंचि नाम लोकांच्या ठायीं ।
अद्यापि राहिलेसें पाही । म्हणती तुकाई जगदंबा ॥
तुकाई नामें नामाभिधान । तें जगदंबेचें निजस्थान ।
अद्यापि पूजिती जन । अतिपावन दंडकारण्यीं ॥

किंवा सुंदरकांडांतील ३८ वा अध्याय पाहा. लंकेवर स्वारी करण्यासाठी समुद्र-किनाऱ्यावर राम ससैन्य आले. त्यांच्याकडे बिभीषण चार प्रधानांसह आला, तेव्हा श्रीरामांनी त्याला आलिंगन दिलें व त्याला आधीच राज्याभिषेक केला. त्यासाठी मारुतीने वाळूची लंका तयार केली. ' ही लंका तूं गहाण म्हणून ठेव. आम्ही ती लौकरच सोडवून घेऊं ' असें श्रीराम बिभीषणाला सांगतात. हनुमंताचें रचनाकौशल्य पाहून सारे स्तिमित होतात. या प्रसंगास उद्देशून एकनाथ म्हणतात,

हनुमंत लंका अद्यापवरी । आहे समुद्राचे तीरीं ।
काळ धाकें जतन करी । भय भारी हनुम्याचें ॥ ८७ ॥

याच कांडांतील ४० व्या अध्यायांतील सेतुबंधनाचा उल्लेखहि अशाच प्रकारचा आहे.

पर्वतपाषाणांच्या हारी । वानरीं टाकिल्या धरेवरी ।
सेतुबंधन यात्रेकरी । अद्यापवरी देखिजेती ॥ १२२ ॥

या निरनिराळ्या स्थलविशेषवर्णनाप्रमाणेच या अप्रसिद्ध चंद्रसेनाख्यानाच्या अध्यायांत कन्याकुमारीची माहिती देण्यांत आलेली आहे. तीवरून दक्षिणतीरावरील कन्याकुमारी म्हणजेच चंद्रसेना अशी माहिती मिळते. राम आणि चंद्रसेना भेटीचा उल्लेख वर आलाच आहे. त्यांतील ही ओवी अशी आहे—

चंद्रसेनेचे मस्तकीं ठेवोनि हस्त । तीसि केलें ध्यानस्त ।
अद्यापि पाहती लोक समस्त । कन्याकुमारि म्हणोनी ॥ १६८ ॥

या सर्व ओव्यांतील 'अद्यापि' हा शब्दहि लक्षांत ठेवण्यासारखा आहे. स्थलविशेषवर्णनाची लकबहि नंतरच्या या ग्रंथपूर्तिकाराने स्वीकारल्याचें दिसतें.

**शंकराला दिलेला वर :**

या अप्रसिद्ध अध्यायांत पुढील अध्यायांतील कांही उद्गारांशीं सुसंगत अशा प्रकारच्या घटनाहि आढळतात. छापील प्रतींतील युद्धकांडाच्या ५६ व्या अध्यायांत लक्ष्मण रामचंद्राची निरनिराळ्या प्रकारें स्तुति करतो व सीतेची सुटका करून रावणाचा वध लवकर करावा अशी विनंती करतो. रामावतार होऊन तो ऋषींचा उद्धार करील असा वर शंकराला मिळाला होता. लक्ष्मण म्हणतो, ' मानवी सूर्यवंशाप्रती । राम अवतरेल दाशरथी । तो राक्षसां करोनी शांती । याग निश्चितीं राखील ॥ ११८ ॥ त्या शिववरदासाठी । तूं एकलेनि जगजेठी । मारोनि राक्षस कोटी । ऋषि इष्टी संपविली' ॥ ११९ ॥ या ओव्यांतील शिववरदानाचा संबंध अप्रसिद्ध अहिरावणाख्यानांतील रामावतार-कथेच्या उल्लेखाशीं जुळणारा आहे. त्याचबरोबर जयरामसुताने असा उल्लेख केलेला नाही, हें लक्षांत ठेवणें जरूरीचें आहे. हा कथाभाग नवीन असल्याने त्यासंबंधीच्या मूळ ओव्या पुढे देत आहे.

लंकानाथाने ' ब्रह्मादिक आदिदेव । सेवक करूनि ठेले सर्व । मृत्युलोकिचे राजे मानव । किंकरत्व दास्य करिती ॥ ९ ॥ त्याची उन्मत्तेकरूनि । पार्वती मागो गेला जगज्जननी । ने दि म्हणतां संकोचनीं । ते समयीं वचन मानिलें ॥ १० ॥ मग राहोनि ध्यानस्त । अंतरीं स्मरला आत्मा रघुनाथ । दुष्ट प्रवर्तला सृष्टीआंत । त्याचा संहार करि स्वामिनाथा ॥ ११ ॥ जालें वेदाचें उच्छळण । गेलें नीतिधर्माचें आचरण । अन्योन्य प्रवर्तलें पूर्ण । पाप दारुण प्रवर्तलें ॥ १२ ॥ मज जी अभय होतें तुझें । संकट मांडिलें विश्वातें । निश्चयें पावेन मी निरुतें । तरि या समयीं पावावें ॥ १३ ॥ मग जोडुनी करि स्तवनें । बहुत स्तुति करी विनवणें । मस्तक ठेवी चरणीं पूर्ण । अत्यांनंदें करुनिया ॥ १४ ॥ मग कृपेनि करुणाकरें । सुप्रसन्न होऊनि सादरें । अभय देवोनि अत्यादरें । भविष्य पुढे जाणोनिया ॥ १५ ॥ करी रे वेदाची स्थापना । चालवी धर्माची प्रतिज्ञा । सुखी ठेवि जी सर्वज्ञा । सत्तासूत्र संरक्षी ॥ १६ ॥ ऐसें कृपेचें वचन । परोपकारी अमृतासमान । संतोषोन राम चिद्घन । हृदयस्थ तो प्रकट जाला ॥ १७ ॥ अभय आसो जनातें । मी नुलंघी वचनातें । दुष्टा संहारिन निश्चितें । जाण निरुतें महेशा ॥ १८ ॥ स्वभावें होणार सारिखें । दशरथ कौशल्येनें तप केलें निकें । आम्हास अवतार घेणें सुखें । अंगऋषी वचनार्थं ॥ १९ ॥ आतां तुम्हासहित सकळ देव । मृत्युलोकीं

किष्किंधा अपूर्व । तेथे येवोनिया सर्व । ऋक्षवानर स्वयें व्हावें ।।२०।। माझी शक्तीचेंनि मिषें । उपाया दोनि कार्यें वसे । उद्धरीन तापसाचें लक्ष । मी अव्यक्त व्यक्तीं प्रकटेन ॥ २१ ॥ ऐसें शिवाचें समाधान । करूनी अदृश्य जाला नारायण । अश्चर्यं मानि भवानी आपण । कोण महिमान शंकराचें' ॥ २२ ॥

या कथाभागांत लक्ष्मणाने पुढे ५६ व्या अध्यायांत उल्लेखिलेल्या ' शिववरदा ' चें बीज आहे, म्हणूनच हा अप्रसिद्ध अध्याय पुढील व मागील कथाभागांत व्यवस्थितपणें बसणारा व सुसंबद्ध अशा प्रकारचा आहे, हें स्पष्ट होतें.

## चंद्रसेनेचा पूर्वसंकल्प :

जयरामसुताच्या व या अप्रसिद्ध अध्यायांतील कथानकांत आणखी एक महत्त्वाचा फरक दिसतो. जयरामसुताच्या अध्यायांत अहिरावणासंबंधीची हकीगत स्वत: चंद्रसेनाच हनुमंताला सांगते; परंतु प्रस्तुत अप्रसिद्ध अध्यायांत मकरा ती माहिती त्याला देते. अहिरावणाने लोहकंटकावर अंगुष्ठ रोवून एकनिष्ठ तप केल्याने नीलकंठ प्रसन्न झाला असा उल्लेख जयरामसुताच्या अध्यायांत आहे. परंतु या अध्यायांत शंकराऐवजी त्याने शेषाला प्रसन्न केल्याचा उल्लेख आहे. ' अहिरावण अजय सर्वथा । येणें अनुष्ठान करोनि तत्वतां । शेष प्रसन्नता केलीसे' ॥ ७० ॥ यानंतर युद्धांत रक्तबिंदु पडतांच असमसाहस अहिरावण उठतील, भ्रमर पाताळांतील अमृत आणून शिंपडतील आणि याला विरोध करणाऱ्याकडून अहिरावणाला मरण प्राप्त होईल, हा कथाभाग दोन्ही अध्यायांतून सर्वसामान्यपणें सारखाच आहे. परंतु रामचंद्राबद्दलची चंद्रसेनेची ओढ प्रथमपासूनच असल्याचें दाखविणारा कथाभाग या अध्यायांत आलेला आहे व तो एकनिष्ठ भक्ति दाखविणारा असल्याने महत्त्वाचा आहे. जयरामसुताच्या अध्यायांतील चंद्रसेना रामचंद्राबद्दल बोलतांना हनुमंताला म्हणते, ' आणि असावा ऐसा भर्ता । पूर्वसंकल्प चित्तीं होता । ' ( ओवी ६३, अध्याय ५४ ). परंतु या पूर्वसंकल्पाची माहिती देणारा कोणताहि उल्लेख त्या अध्यायांत नाही. या अध्यायांत मात्र ' शेषाची कन्या चंद्रसेना हिची प्राप्ति करून घेण्याकरितां अहिरावणाने पुन: तप केलें. परंतु तो गुरुबंधु असल्याने त्या राक्षसाशीं लग्न होऊनहि चंद्रसेना त्याच्याशीं अंगसंग करीना व नारायण हाच आपला भर्तार व्हावा म्हणून तिनें तप सुरू केलें व तें मकरेला कळलें ' असा भाग आला आहे. यासंबंधीच्या मुळांतील ओव्या पुढे देत आहें—

पुनरपि अहिरावणें । अनुष्ठान आरंभिलें चौगुणें । मागों आरंभिलें शेषकन्ये । चंद्रसेने लागुनी ॥ ८१ ॥ तप करूनि आगळा अहिरावण । स्वयें येवोनि मागे कन्यारत्न । आपण संतोषला जाण । देवोनि चंद्रसेना धाडिला ॥ ८२ ॥ ते ह्मणे, ' मी शेषकन्या । वरीना राक्षसा दुर्जना । तो होय माझा गुरुबंधु जाणा । त्यासि अंगसंगा करीना' ।। ८३।। म्हणोनि आदरिलें तपाचरण । भर्तार होवा नारायण । ऐसें करितां अनुदिन । ते मकरेसी कळों सरिलें ॥ ८४ ॥ मकरा ह्मणे, ' साजणी । ना भि ह्मणे आपुलें वचनीं । तूं पावसि माझे प्रयत्नीं । हरि लागुनि भर्तारू ' ॥ ८५ ॥

या कथाभागामुळे चंद्रसेनेची रामाबद्दलची ओढ हा तिच्या पूर्वसंकल्पित भावनेचा भाग असून तिची रामावरील अनुरक्ति ही शंकरावरील पार्वतीच्या भक्तीसारखीच असल्यासारखें दिसतें. चंद्रसेनेबद्दल जयरामसुताचा अध्याय वाचीत असतांना जी घृणेची भावना निर्माण होते, तशी या ठिकाणीं निर्माण होत नाही. त्या अध्यायांतील चंद्रसेना ही पतीशीं प्रतारणा करून परपुरुषाशीं रत होणारी स्वैरिणी वाटते, तर या अध्यायांतील चंद्रसेना ही

विपरीत परिस्थितींतसुद्धा एकनिष्ठ प्रेम करणारी भक्त असल्याचें स्पष्ट होतें. त्या भक्तींतूनच आपलें ईप्सित प्राप्त करून घेण्याकरितां ती हनुमंतास व पर्यायाने रामचंद्रास मदत करण्यास तयार होते, हा भाग सुसंगत असाच आहे.

### जयरामसुत आणि गावबा :

या नव्या उपलब्ध झालेल्या अध्यायामुळे यासंबंधीच्या टीकाकारांच्या मतांचा याच ठिकाणीं परामर्श घेणें योग्य होईल. प्रा. न. र. फाटक यांना अहिमहिरावण आख्यानाचे चारहि अध्याय जयरामसुतानेच लिहिले असावेत असें वाटतें. जयरामसुताच्या अध्यायाची ओवीसंख्या सुमारें ३४० आहे. त्याने उघडउघड या अध्यायांत स्वतःचा नामोल्लेख केला आहे व समारोपहि त्यांतच केलेला आहे. एकच कथानक समग्र सविस्तर सांगितल्याने त्याचा मागच्या पुढच्या कथानकाशीं तादृश संबंध असण्याचें कारण नाही. अहिमहिरावण आख्यानाचे चारहि अध्याय जयरामसुताचे हा प्रा. फाटक यांचा दावा (श्रीएकनाथ-वाङ्मय आणि कार्य : पृष्ठ ३०१–३०२ पाहा.) मला उपलब्ध झालेल्या अप्रसिद्ध परंतु इतर अध्यायांशीं जुळणाऱ्या एकाच अध्यायामुळे खोटा पडणार आहे. 'ज्या अध्यायाच्या शेवटीं या ओव्या आल्या आहेत तोच एक अध्याय जयरामात्मजाचा ही पांगारकरांची समजूत चुकीची आहे' असें प्रा. फाटक म्हणतात; परंतु श्री. ल. रा पांगारकर यांचीच समजूत योग्य असून फाटकांनी मात्र अवास्तव कल्पना केल्याचें दिसतें. हे चारहि अध्याय जयरामसुताचे ही कल्पना त्यांनी कोणत्या आधारावर करून घेतली तें समजत नाही.

'मराठी वाङ्मयाचा इतिहास' खंड २, पृष्ठ ४०८–४०९ वर श्री. ल. रा. पांगारकर म्हणतात, 'हें सप्तकांडात्मक रामायण एकनाथी रामायण म्हणून लोकांत पसरलें. पण त्यांत अहिरावणाख्यान नाही असें पाहून मागून **बऱ्याच वर्षांनी*** कोणी जयरामात्मज नामक कवीने **एवढाच अध्याय** रचून ग्रंथपूर्तीसाठी त्यांत घातला असावा.' लेखाच्या अखेरीस त्यांनी 'जयरामसुत' हें गावबाचेंच नांव असावें असें म्हटलें आहे. श्री. पांगारकर यांना ४४ व्या अध्यायानंतरचा भाग गावबाने लिहिला हीच कल्पना प्रिय असावी. या आख्यानांत जयरामसुताने आपलें स्पष्ट नांव दिलें असल्यामुळे पांगारकरांनी तो 'गावबा' असावा असा स्वमतास पोषक परंतु विवाद्य असा तर्क केल्याचें दिसतें. परंतु जयरामसुत हा कुणी वेगळाच गृहस्थ असून त्याने एकनाथी रामायणाच्या गावबाने पूर्ण केलेल्या भागांत स्वतःचा अध्याय घुसडला व तोच सर्वत्र प्रसारित झाला असेंच म्हटलें पाहिजे. आज ज्या अप्रसिद्ध अध्यायाबद्दल मी लिहीत आहे, तो भाषा, संदर्भ आणि विचारसरणी या दृष्टीने पुढील व मागील अध्यायांशीं जुळणारा असाच व जयरामसुतास अनुपलब्ध असलेला अध्याय तो हाच या मतास पुष्टि देणारा असल्यामुळे, जयरामसुत म्हणजे कुणी वेगळा, तो गावबा नव्हे, हें उघड होतें. याच संदर्भांत डॉ. शं. गो तुळपुळे यांचें मत विचारांत घेण्यासारखें आहे. 'महाराष्ट्र सारस्वता' च्या पुरवणींत पृष्ठ ९२९ वर डॉ. तुळपुळे म्हणतात, "…. हा तिसरा कवि स्वतःचें नांव 'जयरामात्मज' असें सांगतो. त्याचें ठावठिकाण कळत नाही. एवढें मात्र निश्चित की, गावबा आणि जयरामात्मज या दोन भिन्न व्यक्ति आहेत; ल. रा. पांगारकर सुचवितात त्याप्रमाणे ही एकच व्यक्ति नव्हे."

* जाड ठसा माझा.

**अध्याय एकनाथांचा कीं गावबाचा ?**

युद्धकांडाच्या ५५ व्या अध्यायाच्या शेवटीं ग्रंथकर्त्याचा स्वतःबद्दलचा उल्लेख आला आहे, त्यामुळे प्रा. फाटक यांना आश्चर्य वाटलें आहे आणि ' अहिरावणादि चरित्र । सेतु माहात्म्यीं समग्र । लिहिलें असें सविस्तर । नव्हे साचार कल्पित । ' या मूळ एकनाथकृत अहिरावणाख्यानाच्या शेवटच्या शंकापरिहारार्थ लिहिलेल्या ओव्या तें प्रकरण गहाळ झाल्यावर मागून कोणीतरी जोडल्या असाव्या, अशी त्या आश्चर्यावर त्यांनी तोड काढिली आहे (एकनाथ–वाङ्मय आणि कार्य, पृष्ठ ३०२). वस्तुस्थिति अशी आहे, की ४४ व्या अध्यायानंतरचा लेखक कोण याबद्दल स्वतः प्रा. फाटक यांची निश्चिति झालेली नाही. यामुळे अहिरावणाख्यानाचे चार अध्याय जयरामात्मजाचे, अप्रसिद्ध अध्याय खुद्द एकनाथांचा अशीं विधानें त्यांच्याकडून झालेलीं आहेत. ४४ व्या अध्यायानंतरचा लेखक गावबा नसावा या मतास पोषक म्हणून पुढील ओवी त्यांनी दिलेली आहे–

पांवा मधुर ध्वनि वाजे । वाजवित्याचेनि गाजे ।
**जनार्दनें** तैसें कीजे । ग्रंथ लिहविजे मज करीं ॥

आणि गावबासारख्या लेखकास जनार्दनस्वामींच्या कृपेचा हा प्रभाव आहे, इत्यादि गोष्टी हुडसून खडसून सांगण्याचें कारण नव्हतें, असें म्हटलें आहे. या त्यांच्या तर्कावर माझ्याजवळील हस्तलिखितांतील निराळ्या ओवीमुळे व त्यांतील ' जनार्दनाऐवजी ' एकनाथांच्या उल्लेखा-मुळे निराळाच प्रकाश पडत आहे. हस्तलिखितांतील ५४ व्या मंदोदरी-आख्यानाच्या अध्यायांत पुढीलप्रमाणे ओवी आहे–

पावा मधुर ध्वनी गाजे । परी वाजवी त्याचेनि वाजे ।
**येकनाथ** तैसें कीजे । ग्रंथ लिहविजे मज करवीं ॥ १२७ ॥

या ओवींतील ' येकनाथ तैसें कीजे ' हा उल्लेख ते स्वतः या अध्यायाचे कर्ते नव्हते हें सिद्ध करणारा आहे. पांवा जो वाजवितो त्याच्यामुळे मधुर ध्वनि निघतो, त्याप्रमाणे एकनाथ माझ्याकडून हें काम करवून घेत आहेत, असा अर्थ निष्पन्न होतो. या ओवीवरून या अध्या-याचा कर्ता एकनाथांहून कुणी वेगळा आहे, हें तर सिद्ध होतेंच; परंतु युद्धकांडाच्या ४४ व्या अध्यायानंतरची कृति कुणा निराळ्या व्यक्तीची आहे, या आख्यायिकेस पुष्टि मिळते. आता हा कर्ता गावबाच आहे, की दुसरा कोणी ग्रंथकार आहे हा संशोधनाचा विषय होऊं शकेल; परंतु एकनाथ आणि सर्वसामान्य समजुतीप्रमाणे गावबा यांची ' भावार्थ रामायण ' ही संयुक्त कृति आहे, हें मान्य होण्यास हरकत नाही.

**मंदोदरी-आख्यान :**

जयरामसुताने लिहिलेला एकमेव अध्याय वाचल्यानंतर लागलीच पुढील अध्यायांत आलेलें मंदोदरी-आख्यान पाहून प्रा. फाटक यांना आश्चर्य वाटणें साहजिक आहे. परंतु आज मी प्रसिद्ध करीत असलेल्या अध्यायामुळे अहिरावणचरित्र आणि मंदोदरी-आख्यान यांत सुसंबद्धता आहे, हें स्पष्ट होतें. अहिरावणाचें आणि मंदोदरी-आख्यान पूर्ण झाल्यानंतरच

ग्रंथकर्त्याने स्वत:विषयीचा उल्लेख केला आहे. प्रा. फाटक यांनी दिलेली ओवी अशी आहे–
' अहिरावणादि चरित्र । सेतुमाहात्म्यीं समग्र । लिहिलें असे सविस्तर । नव्हे साचार कल्पित ॥ '
या ओवींत ' मंदोदरी-आख्याना 'चा उल्लेख नाही; परंतु माझ्याकडील हस्तलिखितांतील ओवी पुढीलप्रमाणे आहे—'अहिरावणादि चरित्र । सेतुमहात्म्यीं समग्र । लिहिलें असे सविस्तार । मंदोदरी-आख्यान ' ( १२१–५४ ). या ओवींतील ' मंदोदरी-आख्याना 'च्या उल्लेखावरून ' अहिरावण ' आणि ' मंदोदरी ' हीं दोन्ही आख्यानें ग्रंथकर्त्याने ' सेतुबंध-महात्म्यां 'तून घेतलीं व तीं पूर्ण सांगून झाल्यानंतर स्वतःविषयीचा उल्लेख त्याने केला असल्याचें दिसून येतें. या ओवीमुळे मूळ एकनाथांनी अहिरावणाख्यान लिहिलें नाही, त्या अहिरावणाख्यानाच्या शेवटीं शंकापरिहारार्थ ओव्या लिहिलेल्या नसून मंदोदरी-आख्यानाच्या शेवटींच त्या लिहिलेल्या आहेत, आणि प्रा. फाटक यांनी सुचविलेल्या तोडीप्रमाणे मूळ प्रकरण गहाळ झाल्यावर मागून कोणीतरी येथे जोडलेल्या नाहीत, हें सिद्ध होतें. त्याचबरोबर अप्रसिद्ध अहिरावणाख्यानाच्या किंवा चंद्रसेनाख्यानाच्या शेवटीं व्यक्तिगत उल्लेख नसल्याने व तसा उल्लेख लगेच पुढील अध्यायांत दोन्ही अध्यायांच्या नामोल्लेखासह आलेला असल्याने तोच अध्याय सुसंगत आहे, या माझ्या विधानासहि पुष्टि मिळत आहे.

**समारोप :**

या अप्रसिद्ध अध्यायाच्या प्राप्तीमुळे ' भावार्थ रामायणां ' त राहून गेलेली उणीव दूर होईल अशी आशा आहे. अशाच तऱ्हेचे संपूर्ण ओव्या असलेले अध्यायहि मिळण्याची शक्यता आहे. त्या दृष्टीने चिकित्सक वाचकांना या लेखापासून कांही घेतां आलें तर मला आनंद वाटेल. ● ● ●

अनुक्रमणिका

प्रा. सुरेश म. डोळके

# ‘ वत्साहरण ’ : कांहीं विचार

## प्रास्ताविक : मराठींतली ‘ वैदर्भी रीति ’

प्राचीन मराठी काव्याच्या नभोवितानांत महानुभावांचे ‘ साती ग्रंथ ’ आपल्या तेजानें, सौंदर्यानें आणि गांभीर्यानें सप्तर्षींसारखे चमकतात. लक्षावधि तारकांचीं निरांजनें आकाशांत तेवत असलीं तरी तेज आणि पावित्र्य या दृष्टींनी सप्तर्षींनाच जसं महत्त्व असतं, तसंच महत्त्व महानुभाव-वाङ्मयाच्या नक्षत्रमालिकेंत त्यांच्या ‘ साती ग्रंथां ’ ना आहे. ‘ सप्तसमुद्र ’, ‘ सप्त-कुलपर्वत ’ किंवा ‘ सप्तपाताल ’ यांना जसं विशेषनामांचं वैशिष्ट्य मिळालं आणि तीं पुराणांत जशीं अजरामर होऊन बसलीं, तसंच विशेषत्व आणि अजरामरत्व प्राचीन मराठी काव्य-वाङ्मयांत महानुभावांच्या ‘ साती ग्रंथां ’ ना प्राप्त झालेलं आहे.

महानुभावीय काव्याच्या वाङ्मयीन स्वरूपाकडे पाहिलं तर संस्कृतांतल्या ‘ वैदर्भी रीती ’ ची कुणालाहि आठवण होईल. भारतीय संस्कृतीला रम्यता आणि चारुता आणणारी वैदर्भी रीति ही विदर्भाची भारताला देणगी होय असें कांहीं अभ्यासक मानतात. तें खरें असेल किंवा नसेल, पण वैदर्भी रीति केवळ संस्कृतांतच आहे हें मात्र खरें नाहीं; मराठींतहि ती आहे. मराठी वाङ्मयालाहि तिने मृदुता आणि चारुता दिली आहे व ती निर्माण करण्यांत महानुभावीय कवींचा फार मोठा वांटा आहे. ललित आणि मृदुमधुर पदरचना, रम्य आणि स्वाभाविक शब्दचित्रें व सहज ओघाने होणारी रसप्रतीति हे वैदर्भी रीतीचे विशेष महानुभावीय कवींच्या काव्यांत व विशेषत: ‘ साती ग्रंथां ’त उत्कटत्वाने प्रतीत होतात. मराठींत ‘ वैदर्भी रीती ’ चं प्रवर्तन करणारं काव्य निर्माण करण्याचं श्रेय या महानुभावीय कवींनाच आहे हें निर्विवाद.

## काव्याचें नांव

साती ग्रंथांतल्या ज्या काव्याबद्दल मीं लिहीत आहें त्याचें मूळ नांव काय असावें ?

कै. पांगारकर[1] व डॉ. य. खु. देशपांडे[2] यांनी ‘ वत्सहरण ’ या नांवाने प्रस्तुत काव्याचा उल्लेख केला आहे. कै. भावे[3], बा. अ. भिडे[4] व कै. पंगु[5] यांनी या काव्याला ‘ वच्छहरण ’ हें नांव दिलें आहे. किंबहुना, कै. भावे यांनी ‘ वच्छहरण ’ या नावाने हें काव्य पहिल्यांदा [शके १८४६] प्रसिद्ध केल्यापासून तें सामान्यतः त्याच नांवाने ओळखलें जातें. डॉ. कोलते यांनी मात्र ‘ वछाहरण ’ या नांवानें तें [ १९५३ सालीं ] प्रकाशित केलें आहे.

---

१. मराठी वाङ्मयाचा इतिहास, खंड १, पृ. ४५६.
२. महानुभावीय मराठी वाङ्मय, पृ. २८. श्रीऋद्धिपूरवर्णन, प्रस्ता. पृ. १.
३. ‘ वच्छहरण ’ : संपादक —भावे.
४. मराठी भाषेचा व वाङ्मयाचा इतिहास, पृ. १२३.
५. ‘ वच्छहरण ’ : संपादक—द. सी. पंगु.

मी या काव्याच्या एकूण सहा हस्तलिखित पोथ्या पाहिल्या. पण 'वत्सहरण' किंवा 'वच्छहरण' हीं रूपें मला एकाहि पोथींत आढळलीं नाहीत. त्यांपैकी तीन पोथ्यांत 'वत्साहरण' हें रूप असून तीनमध्ये 'वछाहरण' हें रूप आहे. अर्थात्, प्रस्तुत काव्याची नामनिश्चिति 'वत्सहरण' किंवा 'वच्छहरण' अशी न करतां ती 'वत्साहरण' किंवा 'वछाहरण' यांच्याच अनुरोधाने करावयास हवी. कै. भावे व कै. पंगु यांनी छापलेल्या 'वच्छहरणा' च्या प्रतींतहि कवीने आपल्या काव्याचा निर्देश 'वत्साहरण' असाच केला आहे [ओवी ४४].

माझ्याजवळ 'वत्साहरणा' च्या ज्या सहा पोथ्या आहेत, त्यांपैकी 'शके १४९५ श्रीमुखसंवत्सरे' लिहिण्यांत आलेल्या बाळबोध लिपींतल्या पोथींत काव्याचें नांव 'वछाहरण' (४४) असें आढळतें. या पोथींत समाप्तिलेख नाही. काव्य संपल्यावर एकदम शक-संवत्सराचाच निर्देश आहे. यांत वछ (३१८, ३१३), वछां (२००, ३२५), वछें (१०५, २७०, ३१९) अशीं 'छ'कारयुक्त रूपेंच बहुशः आढळतात. पण त्याचरोबरच, 'वत्सा' (३२७) हेंहि रूप यांत आहे. 'शके १५९७ अनल संवत्सरीं' लिहिण्यांत आलेल्या व भुसावळ येथील म. मुरलीधरशास्त्री आराध्य यांनी पाठविलेल्या [हिच्यांत कालोल्लेख नाही] अशा दोनहि पोथ्यांत वछ, वछा अशीं 'छ'कारयुक्त रूपेंच प्रायः आढळतात. पण त्याबरोबरच वत्स, वत्सा अशींहि रूपें, क्वचित् का होईना, या पोथ्यांत येतात हेंहि लक्षांत घेतलें पाहिजे.

'वत्साहरण' हा काव्यनामाचा उल्लेख असलेल्या (ओ. ४४) एकूण तीन पोथ्या माझ्याजवळ आहेत. त्यांपैकी एक कै. श्रीकृष्णराजदादा पारिमांडल्य यांची असून दोन ऋद्धिपूर येथील महन्त गोपीराज महानुभाव यांच्या संग्रहांतल्या आहेत. कृष्णराजदादांच्या पोथींत लेखनशक नाही. तरी ती सुमारें तीनशे वर्षांपूर्वीची असावी असें तिच्या स्वरूपावरून वाटतें. या पोथींत 'वत्साहरण' हें काव्याचें नांव असून सर्वत्र 'वत्स', 'वत्सा' अशींच रूपें आहेत. 'छ'कार एकदाहि नाही. गोपीराज ग्रंथसंग्रहांतून उपलब्ध झालेल्या एका पोथींत वत्साहरण, एकादश०, ज्ञानप्रबोध, नरींद्र, शिशुपालवध, ऋद्धिपूरवर्णन व सह्याद्रिमहात्म्य हीं सातहि काव्यें आहेत. 'वत्साहरण' प्रारंभींच लिहिलेलें असून त्याच्या सुरुवातीच्या १४ ओव्या गेल्या आहेत. बाकी ग्रंथ पूर्ण आहे. शेवटीं 'सह्याद्रिमहात्म्य' हें काव्य असून त्याच्या समाप्तिलेखांत 'दुदभी शत्सरी...' असा कालनिर्देश आहे. यांत काव्यनामाचा उल्लेख 'वत्साहरण' असाच आहे (४४). 'इति दामोदर पंडित ओवीप्रबंध **वत्साहरण** समाप्तमगमत् शुभं भवेत्' या समाप्तिलेखावरूनहि 'वत्साहरण' हेंच काव्याचें नांव असल्याचें दिसतें. या पोथींत वत्स (३१७, ३२२), वत्सा (१९९, ३३९), वत्सें (१०५, २०७, ३१८) अशीं 'त्स'कारयुक्त रूपेंच सर्वत्र आढळतात.

**छकार एकदाहि नाही**

गोपीराज ग्रंथसंग्रहांतून मिळालेल्या दुसऱ्या पोथींत वत्साहरणाचे आरंभ व शेवट कायम आहेत; पण तिच्यांत लेखनशक मात्र कुठेच निर्दिष्ट नाही. पोथीच्या कागदावरून व तिच्या अत्यंत जीर्णावस्थेवरून ती सुमारें चारशे वर्षांपूर्वीची तरी असावी असें वाटतें. तिच्या प्राचीनतेचें आणखी एक गमक असें की, इतर सर्व पोथ्यांत आढळणारी वत्साहरणाची ५०३ ही ओवीसंख्या तिच्यांत ५०२च आहे. या पोथींत काव्याचें नांव असलेली ओवी

जे अज्ञान–तमाची तरणी : कैवल्यपदाची नीसानी
ते श्रीकृष्णकथा **वत्साहरणी** : सांधिजैल ॥ ४४ ॥

अशी आढळते. प्रस्तुत पोथींत वत्स हा शब्द–वत्स ( ३१७, ३२२ ), वत्सां ( १९९, ३२५, ३२७, ३३९ ), वत्सें ( १०५, २७०, ३१८ ), वत्सलु ( १०५, ३९५ ), संवत्सरु ( ३४६ )–असा सर्वत्र ‘ त्स’कारयुक्तच लिहिलेला आढळतो; छ–युक्त एकदाहि नाहीं.

**‘ वत्साहरण ’ की ‘ वछाहरण ’ ?**

वरील उल्लेखांवरून ‘ वत्सहरण ’ किंवा ‘ वच्छहरण ’ हें प्रस्तुत काव्याचें नांव एकाहि पोथींत नसून काव्याच्या हस्तलिखितांत सर्वत्र तें ‘ वत्साहरण ’ किंवा ‘ वछाहरण ’ असेंच आढळतें हें तर स्पष्ट होईलच; पण ‘ वत्स ’ व ‘ वछ ’ यांपैकी ‘ वत्स ’ या तत्सम रूपाकडे लेखकांचा कल अधिक होता हेंहि अभ्यासकांच्या लक्षांत येईल. राजवाडे यांच्या ज्ञानेश्वरींत ‘ वछा ’ असें रूप एकदा आलें आहे. [ रा. ज्ञा. १८–१४५७ ]. पण त्याचा उल्लेख अपवाद म्हणूनच करावा लागेल. एरवी वत्स ( १३–३९६, १८–७७, ७८२ ), वत्सू ( १८–४७८ ), वत्सा (१३–४८५), वत्साचा ( ७–७१७ ), वत्सल (१२–२३४, १८–३ ) अशीं त्स-रूपेंच राजवाडे–ज्ञानेश्वरींत आढळतात. वरील उल्लेखांवरून ‘ वछाहरण ’ याऐवजी ‘ **वत्साहरण** ’ हेंच या काव्याचें नांव निश्चित केलें पाहिजे असें मला वाटतें.

याला उपोद्बलक असे आणखी कांही पुरावे सादर करतां येतील.

प्रस्तुत काव्याची पीठिका सांगणाऱ्या वृद्धाचार, अन्वयस्थळ, टीप इत्यादि ग्रंथांतहि ‘ वत्साहरण ’ हेंच या काव्याचें नांव आढळतें. ‘ वृद्धाचारां ’तल्या ‘ पंडितीं **वत्साहरण** करणें ’ या आख्यायिकेंत व तिच्यांतल्या ‘ पंडितवासीं **वत्साहरण** केलें ’ या वाक्यांत[६], हरिबास व सोंगोबास यांच्या ‘ अन्वयस्थळां ’तल्या ‘ पंडितीं **वत्साहरण** केलें ’ या निर्देशांत[७], किंवा ‘ साती ग्रंथां ’च्या तृतीय शोधनीच्या टीपांतील वत्साहरणाच्या मूळ पीठिकेंतल्या ‘ पंडितीं **वत्साहरण** ग्रंथ केला ’ या उल्लेखांत—‘वत्साहरण’ असाच प्रस्तुत काव्याचा नामनिर्देश आहे, ‘ वछाहरण ’ असा एकदाहि नाही. सह्याद्रि वर्णनावरील टीपकारानेहि, साती काव्यांची ग्रंथशृंखला सांगतांना ‘ना श्री दत्तात्रेय प्र त्रेतीचा अवतार : असता : **वत्साहरण**... ना **वत्साहरणी** बालक्रीडा : ’ यांत **वत्साहरण** असाच प्रस्तुत काव्याचा उल्लेख केला आहे.

दुसऱ्या शोधनीच्या टीपकारानेहि ‘ आता **वत्साहरन** ’ अशी सुरुवात करून ‘ एवं **वत्साहार**नाचा सरोळेयासहीत टीप सपोर्व समात: ’ या वाक्याने आपल्या टीपग्रंथाचा शेवट केला आहे. त्यांत वत्स ( २८२, ३२२, ३३२ ), वत्से ( २७० ) अशींच रूपें सर्वत्र आढळतात. छकारयुक्त रूप एकदाहि नाही. डॉ. कोलते यांनी ‘ वछाहरणां ’त छापलेल्या टीपग्रंथांतहि वत्स ( २७०, ३२२, ३६७ ), वत्सा ( ३३२ ), वत्सें ( २८२ ), वत्साहरण अशींच रूपें आहेत.

‘ वछाहरण ’ याऐवजी ‘ वत्साहरण ’ हेंच या काव्याचें नांव निश्चित केलें पाहिजे असें मीं कां म्हणतों हें आता पुरतें स्पष्ट होईल. प्रस्तुत काव्याच्या अंतर्गत व बाह्य अशा दोनहि प्रकारच्या पुराव्यांवरून **वत्साहरण** हेंच या काव्याचें नांव मीं निश्चित केलें आहे. **वत्सांचें ‘ आहरण ’ तें ‘ वत्साहरण ’ अशी याची उपपत्ति लावली पाहिजे.**

६. स्मृतिस्थळः संपादक—वा. ना. देशपांडे, पृ. ८२.
७. म. सा. पत्रिका, अंक १०६, पृ. २६ पाहा.

## 'वत्साहरणां 'त वत्सहरण आहेच

वत्सहरण हें नाव उच्चारतांच ब्रह्मदेवाने केलेल्या वत्सहरणाचा प्रसंग एकदम डोळ्यांपुढे उभा राहतो. भागवत, पद्मपुराण व ब्रह्मवैवर्तपुराण या पुराणग्रंथांत वत्सहरणाची कथा आलेली आहे. प्रस्तुत कवीचा पुराणांशीं परिचय असला ( १७ ) तरी त्याने भागवतांतल्याच कथेच्या आधारावर आपल्या काव्याचा इमला उभारला ( २८, ३६ ) यांत शंका नाही.

श्रीमद्भागवताच्या दशम स्कंधाच्या १२ व्या अध्यायांत श्रीकृष्णाने केलेल्या अघासुर-वधाचा व १३ व्यांत ब्रह्मदेवाने केलेल्या वत्स-वत्सपाल-हरणाचा प्रसंग असून १४ व्यांत ब्रह्मदेवाने केलेली बालकृष्णस्तुति आहे. या तीन प्रसंगांना, स्वतः भागवतकारांनीच, एकाच कथेंत अनुस्यूत केलें आहे.[८] भागवतकारांचें अनुकरण करून प्रस्तुत कवीनेहि 'वत्साहरण' या काव्यांत अघासुर–वध, वत्स-वत्सपाल–हरण व ब्रह्मस्तुति या तीनहि प्रसंगांचा अंतर्भाव केला आहे.

'आहरण' या शब्दाचा 'हरण' असाहि अर्थ होतो. कालिदासाने 'को लम्बयेदाहरणाय हस्तम्' या श्लोकांत[९] 'आहरण' हा शब्द हरण या अर्थींच [ अपहर्तुं ] वापरला आहे. जगन्नाथपंडितांनी आविद्या हा शब्द अविद्या या अर्थी[१०] व भासाने आधिपतेः हा शब्द अधिपतेः या अर्थी[११] वापरल्याचीं उदाहरणेंहि दाखवितां येतील. 'दीनानाथ' या सामासिक शब्दांतहि अनाथ हा शब्द नाथ या अर्थी योजलेला असतो.

या 'आ 'ची निष्कृति करतांच येणार नाही असें मात्र नाही. आसमन्तात् अविद्याः आविद्याः, आसमन्तात् अधिपतेः आधिपतेः, दीनानाम् आसमन्तात् नाथः दीनानाथः। अशा रीतीने, "आसमन्तात्'च्या योजनेने मूळ अर्थांत बदल होऊं न देतां, या 'आ 'ची निष्कृति सहज करतां येईल.

अर्थात्, 'वत्साहरण' या काव्यनामांतून ब्रह्मदेवाने केलेल्या वत्साहरणाची मूळ भागवती कथा, ब्रह्मदेवाच्या अपेक्षेनेहि, अभिव्यक्त होते यांत शंका नाही. अघासुराने केलेलें वत्सहरणहि यांत अंतर्भूत आहेच.

## वत्सहरण की वत्साहरण ?

पण, 'वत्साहरण' या काव्यनामावरून केवळ वत्सहरण एवढाच अर्थ कवीला अभिप्रेत असेल असें वाटत नाही. तसें असतें तर त्याने कदाचित् 'वत्सहरण' हेंच नांव आपल्या काव्याला दिलें असतें; वत्साहरण असें रूप योजलें नसतें. [ श्रीधराने 'वत्सहरण' हाच शब्द वापरला आहे, हरिविजय, अ. १० ]; पण प्रस्तुत काव्याच्या एकाहि पोथींत 'वत्सहरण' हें नांव एकदाहि ज्या अर्थी आढळत नाही, त्या अर्थी **वत्साहरण** हाच शब्द कवीला मुद्दाम वापरावयाचा आहे हें उघड दिसतें. 'वत्साहरण' हें आपल्या काव्याचें नांव योजून कवीने, त्याला अपेक्षित असलेला, काव्याचा मुख्य विषयच नेमका सुचविला आहे.

'आहरण' याचा अर्थ 'आणणें' असा होतो. 'यदेव वव्रे तदपश्यदाहृतम्' [रघु. ३-६], 'पुष्पं फलं चार्तवमाहरन्त्यः' [ रघु. १४–७७ ], 'शान्ते पितर्याहृतपुण्डरीका' [रघु. १८-८] या उदाहरणांत कालिदासाने 'आणणें' या अर्थीच प्रस्तुत शब्द वापरला आहे. वत्साहरण म्हणजे

८. श्रीमद्भागवत, दशमस्कन्ध, १४–६०.
९. रघुवंश, ६–७५.
१०. गंगालहरी २.
११. स्वप्नवासवदत्तम् ५–५.

वत्स आणणें. ब्रह्मदेवानें श्रीकृष्णाच्या वत्सांचें ( गोवत्स व गोपवत्स ) हरण केलें होतें. पण, श्रीकृष्णाच्या शक्तिसामर्थ्यानें विस्मयचकित होऊन 'तो वांसरुए आंगिता जाला: क्षणांमाजि' ( ४७७ ). श्रीकृष्णाच्या अद्भुत सामर्थ्यानेंच जणू वत्सांचें आहरण केलें होतें. कवीला ब्रह्मदेवाने केलेल्या वत्सहरणापेक्षा श्रीकृष्णाने केलेल्या वत्साहरणावर व त्यांतून व्यक्त होणाऱ्या श्रीकृष्णाच्या अनन्यश्रेष्ठत्वावरच भर द्यावयाचा आहे. त्याकरिताच त्याने हें काव्य लिहिलें. किंबहुना, श्रीमद्भागवत हा ग्रंथच मुळी श्रीकृष्णाच्या लीला-विलासांचें वर्णन करण्याकरिता निर्माण झाला आहे. वत्साहरणाच्या कथेंतून भागवतकारांनाहि श्रीकृष्णाचें अद्वितीयत्वच सुचवावयाचें आहे. श्रीकृष्णश्रेष्ठत्व अधिक परिणामकारक व कलात्मक व्हावें म्हणून त्यांनी ब्रह्मदेवाचा उपयोग पार्श्वभूमीसारखा केला. कवीच्या श्रीकृष्णभक्तीने भारावलेल्या हृदयाला प्रस्तुत काव्यांत 'श्रीकृष्ण-महिमान' ( ३७ ) वर्णावयाचें असल्यामुळे तें ज्यांतून व्यक्त होईल असें 'वत्साहरण' हें नांव त्याने आपल्या काव्याला हेतुपूर्वक दिलें. 'वत्साहरण' या काव्यनामांतून कवीच्या हृदयांतली श्रीकृष्णश्रेष्ठत्वाची भावना फार सुंदर रीतीने व्यक्त होते.

अघासुराने सर्परूपाने गिळलेल्या वत्सांचेंहि श्रीकृष्णाने आहरण केलें होतें. 'समिदाहरणाय प्रस्थिता वयं' [ शाकुं. १ ], 'समित्कुशफलाहरैः' [ रघु. १-४९ ], अयं गच्छति भर्ता मे फलाहारो महावनं' [ सिद्धान्तकौमुदी ] या वाक्यांत आहरण हा शब्द केवळ आणणें या अर्थी नसून 'जाऊन आणणें' या अर्थी वापरलेला आहे. श्रीकृष्णाने अघासुराच्या पोटांत शिरून (१०७) त्याने हरण केलेल्या वत्सांचें आहरण केलें होतें. अघासुरप्रकरणांत श्रीकृष्णाचें सामर्थ्य त्याने केलेल्या वत्सांच्या [ गोवत्स व गोपवत्स ] आहरणांतूनच व्यक्त होतें. 'वत्साहरण' या काव्यनामांतून कवीने हाहि आशय फार मार्मिकतेने सुचविला आहे. 'वत्सहरण' हें नांव या आशयाला अपुरें पडलें असतें.

'आ' उपसर्गासहित 'हृ' धातूला 'ल्युट्' [ 'कृत्यल्युटो बहुलम्' या सूत्रानुसार 'भावे या अर्थी' ] हा प्रत्यय लावला तर 'आहरण' हा शब्द सिद्ध होऊन त्याचा अर्थ 'खाणें' असाहि होऊं शकेल. यानुसार 'अमृताहरण' याचा 'अमृत खाणें' असा अर्थ होईल. आहरण हा शब्द खाणें या अर्थी वापरलेला मला कुठेच आढळला नाही. ज्या शब्दाचा कवींनी उपयोग केला नसेल तो शब्द, शास्त्रसिद्ध असला तरी, अप्रसिद्ध अर्थाने वापरणें हा संस्कृत साहित्यशास्त्रानुसार दोष गणला जातो.[१२] अर्थात्, वत्साहरण हा शब्द शास्त्रसिद्ध असला तरी त्याचा 'वत्स खाणें' असा अर्थ करणें अप्रयुक्त होईल. पण, श्लेषाच्या बाबतींत मात्र, संस्कृत साहित्यशास्त्रानुसार,[१३] तो दोष ठरणार नाही. अर्थात्, 'वत्साहरण' या शब्दांतून श्लेषच काढावयाचा असला तर 'वत्स खाणें' हा अर्थ सहज निघूं शकेल व अघासुराने [ गोवत्स व गोपवत्स ] वत्सांना गिळलें होतें हा प्रस्तुत काव्यांतला कथासंदर्भ ध्यानांत घेतला तर कवीने योजलेल्या 'वत्साहरण' या काव्यनामांतली सूचकताहि व्यक्त होऊं शकेल.

वरील सर्व विवेचनावरून 'वत्साहरण' हें आपल्या काव्याचें नांव योजण्यांत कवीच्या बुद्धीचा उन्मेष कसा प्रतीत होतो हें सहज दिसून येईल. प्रस्तुत काव्याच्या नांवासंबंधी अभ्यासकांत अनेक मतमतान्तरें दिसून आल्यामुळे व 'वच्छहरण' आणि 'वछाहरण' या नांवांनी तें प्रकाशितहि झालें असल्यामुळे त्याचें खरें नांव काय असावें याचा मी इतक्या

१२. 'अप्रयुक्त तथाऽऽम्नातमपि कविभिर्नादृतम्'—'काव्यप्रकाश', ७-३.
१३. 'स्यातामदोषौ श्लेषादौ निहतार्थाप्रयुक्तने'—'साहित्यदर्पण', ७-१७.

विस्ताराने ऊहापोह केला. महानुभाव–वाङ्मयाच्या इतिहासांत प्रस्तुत काव्य **वत्साहरण** याच नांवाने निर्दिष्ट व्हावयास हवें.

**वत्साहरणाचा कर्ता कोण ?**

प्रस्तुत काव्याच्या नांवाप्रमाणेच त्याच्या कर्त्याचाहि विचार पूर्वग्रहनिरपेक्ष दृष्टीने केला पाहिजे. 'वत्साहरण' या काव्याचा कर्ता कोण असावा ?

कै. भावे,[१४] कै. भिडे,[१५] कै. पांगारकर,[१६] डॉ. तुळपुळे[१७] प्रभृति प्राचीन मराठी वाङ्मयाच्या इतिहासकारांनी व डॉ. य. खु. देशपांडे,[१८] श्री. वा. ना. देशपांडे,[१९] डॉ. कोलते,[२०] कै. पंगु[२१] प्रभृति महानुभाव-संशोधकांनी या काव्याचें कर्तृत्व दामोदर पंडिताकडे दिलें आहे. वत्साहरणनिर्मितीच्या मानाचें शेलापागोटें अभ्यासकांनी निभ्रांतपणाने दामोदर पंडिताला अर्पण केलें आहे. पण, दामोदर पंडित हा खरोखरीच या काव्याचा कर्ता ठरूं शकेल काय ?

**काव्यांतर्गत पुरावा**

बाह्य पुराव्यापेक्षा अंतर्गत पुरावा नेहमीच अधिक महत्त्वाचा असतो. 'वत्साहरणा'चा अंतर्गत पुरावा पाहिला तर जिथे जिथे कवीने काव्य रचल्याचा उल्लेख येतो, तिथे तिथे, काव्याच्या सर्व प्रतींत, [ ओ. ६,६२,१२३,१९७,३७५ ] **केशिराज मुनि, मुनि केशिराज,** हेंच नांव आढळतें. काव्यवस्तूच्या शेवटींहि —

अनंदतु भगत सकल । श्रोतेयांचे मन हो निर्मल
जनु पावो परम मंगल । म्हणे **मुनी केशिराजु** ( ५०२ ).

असा केशिराजांच्याच नांवाचा 'अभंग' आहे. वरील ओवींत आपल्या काव्याची फलश्रुतीच केशिराजांनी सांगितली आहे.

पण, या ओवीच्या खालीच

हा सारासार–वस्तु–विचारु । आइकावो करुनि आदरु ।
म्हणे **पंडितु दामोदरु** । स्रोतेयांतें ( ५०३ )

असा 'पंडित दामोदरा'चा उल्लेख आहे. दामोदर पंडिताला वत्साहरणाचा कर्ता समजण्यांत काव्यांत निर्दिष्ट असलेला असा हा एवढाच उल्लेख दाखविण्यांत येतो.

पण, साऱ्या काव्यांत कवि म्हणून केशिराजांचा अनेकदा उल्लेख असतांना केवळ शेवटल्या, व त्याहि काव्याच्या फलश्रुतीनंतरच्या, ओवींत दामोदराचा निर्देश येतो, यावरून दामोदर हाच या काव्याचा कर्ता असं समजणं कितपत सयुक्तिक आहे ?

---

१४. महाराष्ट्र–सारस्वत, १ (आ. ३ री) पृ. १०६; वच्छहरण–प्रस्ता.
१५. म. भा. व वा. इतिहास, पृ. १२३.
१६. म. वा. इतिहास, १ पृ. ४५७.
१७. म. सा. पुरवणी, पृ. ८७१.
१८. महा. म. वाङ्मय, पृ. २८.
१९. स्मृतिस्थळ, प्रस्ता. पृ. १६.
२०. वछाहरण, प्रस्ता. पृ. १८.
२१. वच्छहरण, प्रस्ता. पृ. २० ( आ. २ री ).

## काव्यांत कविनामाचा उल्लेख

काव्याचा कर्ता या नात्याने कवीचें नांव काव्यांत कुठे येईल याचा नियम सांगतां येत नाही. तरीहि, काव्याच्या प्रारंभीं,[२२] काव्याच्या प्रस्तावनेंत,[२३] काव्याच्या शेवटीं,[२४] काव्यांतल्या उपकथानकांच्या किंवा प्रकरणांच्या अखेरीला,[२५] आपल्या काव्याकडे श्रोत्यांनी अवधान द्यावें अशी विनंती कवीला करावयाची असेल तिथे[२६] किंवा कवीला त्याच्या दृष्टीने कांही महत्त्वाचा संदेश वा अभिप्राय व्यक्त करावयाचा असेल तर त्या ठिकाणीं[२७] काव्यांत कवीचें नांव येत असतें असें सर्वसामान्यपणें म्हणावयास प्रत्यवाय नाही. नरेंद्र, शिशुपालवध, उद्धवगीता, ज्ञानप्रबोध, ऋद्धिपूरवर्णन इत्यादि साती काव्यांवरून हेंच सिद्ध होतें. 'वत्साहरण'हि याला अपवाद नाही.

## कवीची स्व-निष्ठा

काव्यांत आपल्या नांवाचा कवि जेव्हा उल्लेख करतो तेव्हा तो स्वनिष्ठ होत असतो, स्वनिष्ठेंतूनच आपलें नांव काव्यांत ग्रथित करण्याची प्रवृत्ति निर्माण होते, 'स्व'चा विकास होत होत स्व-निष्ठेच्या कक्षा या विश्वस्पर्शी होऊं शकतात, नाहीं असें नाही. 'म्हणोनि आपणपां विश्व देखिजे । आणि आपण विश्व होइजे' असें म्हणणाऱ्या ज्ञानदेवांचें तसें झालें होतें. पण, सारें विश्व आपल्यांत सामावलें आहे अशी वृत्ति झालेला आत्म-साक्षात्कारी संतसुद्धा जेव्हा स्वतःच्या नांवाचा उल्लेख आपल्या काव्यांत करतो तेव्हा त्याचा विश्वसमावेशक आत्माहि, किंचित्काल का होईना, स्वनिष्ठ झाल्याशिवाय राहत नाहीं. हा 'स्व'चा उल्लेख विश्वात्मक प्रवृत्तीच्याहि काव्याचा कर्ता कोण असावा हें ठरवितांना उपयोगी पडावा.

## 'केशिराज मुनि'

वरील दोन कसोट्यांच्या अनुरोधाने विचार केला तर 'वत्साहरण' या काव्याचा कर्ता कोण ठरेल ?

वत्साहरणांत सहा ठिकाणीं केशिराजांचा उल्लेख कवि म्हणून आला आहे. नमनानंतरच्या ओवींत ( ६ ), काव्याच्या प्रस्तावनेंत ( ६२ ), अघासुर–प्रकरण या उपाख्यानाच्या शेवटीं ( १२३ ), यमुना-वर्णनाच्या अखेरीला ( १९७ ), कवीला—

२२. शिशुपालवध, ७.

२३. शिशु. २४; ऋद्धिपूरवर्णन ३१; ज्ञानप्रबोध २०.

२४. शिशु. १०८९; उद्धवगीता ८२७; ज्ञा. प्र. १२०२; नरेंद्र २९३६; ऋ. पू. व. ६४५.

२५. शिशु. २३२; नरेंद्र ८५६, १२९६; ज्ञा. प्र. ६०, २१४, ३९९, ५०० इ.; ऋ. पू. वर्णन १८१.

२६. शिशु. ३०९, ७४३; उ. गी. ५०४; नरेंद्र ४९, १८८, ११८६, २११५, २५५३ इ.; ज्ञा. प्र. ८४०.

२७. ऋ. पू. व. ६३७.

‘ सांडा सांडा अहंकार । अनुशरा श्रीचक्रधरा
मग जाणाल परापर । विचारातें
तोचि ध्या मनि । तेयाचे पवाडे आइका कानी
म्हणे केसीराजु मुनी । श्रोतेयांतें ’

असा सन्देश द्यावयाचा आहे. तेव्हा ( ३७५ ) व काव्याची फलश्रुति सांगतांना–काव्यान्तीं ( ५०२ ) ३७४ व ३७५ या ओव्यांत जो संदेश कवीला द्यावयाचा आहे तो ‘ केसीराजु मुनी ’ चा आहे, दामोदर पंडिताचा नव्हे.

प्रस्तुत काव्य ५०२ या ओवीपाशीच संपतें. ५०३ ही ओवी मूळ काव्य संपल्यावर काव्यांत अंतर्भूत करण्यांत आली आहे. अर्थात्, मूळ काव्य खरें ५०२ च ओव्यांचें आहे. ५०२ हीच या काव्याची शेवटली ओवी. त्या ओवींत कवीने --

अनंदतु भगत सकल । श्रोतेयांचें मन हो निर्मल
जवु पावो परम मंगल । म्हणे मुनि केशिराजु ( ५०२ )

असें पसायदानहि मागितलें आहे. सुरुवातीपासून तों या शेवटल्या ओवीपर्यंत–साऱ्या काव्यांत-काव्याचा कर्ता म्हणून निरपवादपणें केशिराजाचाच उल्लेख आहे, दामोदर पंडिताचा एकदाहि नाही. अर्थात् काव्यांतर्गत पुराव्यावरून केशिराज मुनि हाच प्रस्तुत काव्याचा कर्ता ठरतो. साती ग्रंथांतल्या इतर काव्यांतल्याप्रमाणे वत्साहरणांतल्या कविनामनिर्देशाच्या स्थळांवरूनहि केशिराज मुनि हाच प्रस्तुत काव्याचा कर्ता ठरेल.

५०३ या ओवीकडे सूक्ष्मपणाने पाहिलें तर ती ओवी कविनामनिर्देशात्मक नसून अभिप्रायवजा वाटते. केशिराज मुनीने प्रस्तुत काव्यांत जो ‘ सारासार-वस्तु-विचार ’ सांगितला तो आदराने ऐकण्याची दामोदर पंडिताने या ओवींत श्रोत्यांना शिफारस केली आहे. इतरांच्या काव्यावर अभिप्राय देण्यांची प्रवृत्ति नवीन नाही. बाईदेवव्यासाने भास्करभट्टाच्या शिशुपाळवधावर व एकादशस्कंदावर दिलेले अभिप्राय प्रसिद्धच आहेत.[२८]

केशिराजाने विशेष केलें तें असें की, दामोदर पंडिताचा अभिप्राय त्याने मूळ काव्याबरोबरच निर्दिष्ट केला. ग्रंथाच्या शेवटीं जसे विद्वानांचे अभिप्राय जोडलेले असतात, तसाच प्रकार इथेहि झाला आहे. केशिराज दामोदराचा परमस्नेही होता. नागदेवाचार्यांनी केशिराज व दामोदर पंडित या दोघांचाहि उल्लेख एकाच संदर्भात अनेकवार केलेला आढळतो.[२९] दामोदराने आपल्या स्नेह्याचें काव्य ऐकण्याची श्रोत्यांना शिफारस करणें अशक्य तर नाहीच, पण त्याच्या स्नेहाच्या दृष्टीने योग्यहि होतें. केशिराजानेहि, आपलें काव्य संपल्यावर, दामोदराच्या अभिप्रायाचा मुद्दाम उल्लेख करून, आपला मित्रस्नेह अमर केला आहे.

यावरून, अन्तिम ओवी ही ‘ वत्साहरण ’कर्त्या कवीची नसून अभिप्रायकाची आहे व कविनामनिर्देशाच्या दृष्टीने, काव्यांतर्गत उल्लेखांप्रमाणे, तिला यत्किंचितहि महत्त्व नाही हें स्पष्ट होईल.

कवीच्या स्वनिष्ठेच्या दृष्टीने विचार केला तरी केशिराजच या काव्याचा कर्ता ठरतो. कवि इतरांच्या नांवावर काव्य लिहिणें अशक्य नाही असें म्हणतात. पण मग त्यांत तो स्वतःचा उल्लेख कवि म्हणून कशाला करील ! ज्याची स्वनिष्ठा इतरांच्या नांवावर काव्य

२८. वृद्धाचार ७.

२९. स्मृतिस्थळ ६६, ६८, ८८, २५३. ‘ पंडिता केसवदया तुम्ही माझे डोळे गा ’– अन्वयस्थळ.

लिहिण्याइतकी व्यापक झाली आहे तो त्या काव्यांत स्वतःचा निर्देश कवि म्हणून कुठेच करणार नाही. दामोदराने जर वत्साहरण लिहिलें असतें तर त्यांत त्याने केशिराजाचा उल्लेख, कवि या नात्याने, एकदाहि केला नसता. तसा उल्लेख करणें हें त्याच्या स्वनिष्ठेशीं विसंगत आहे. उलट, केशिराजाने मात्र स्वतःचा उल्लेख कवि म्हणून जो अनेकवार केला, तो त्याच्या स्वनिष्ठेशीं पूर्ण सुसंगत आहे. किंबहुना त्याच्या स्वनिष्ठेंतूनच हे उल्लेख आविर्भूत झाले आहेत असें म्हणावयास हरकत नाही. अन्तिम ओवींत दामोदराचा जो निर्देश आहे तो कवीचा नसून अभिप्रायकाचा होय हें मीं दाखविलेंच आहे.

सारांश, काव्याचा अंतर्गत पुरावा व कवीची स्वनिष्ठा या दोनहि कसोट्यांवरून केशिराज मुनि हाच 'वत्साहरणा'चा कर्ता ठरतो, दामोदर पंडित नव्हे.

**बाह्य पुरावा**

आता बाह्य पुराव्याचा विचार करूं. 'वृद्धाचार', 'अन्वयस्थळ' व 'टीपग्रंथ' यांच्या मतानुसार दामोदर पंडित हा या काव्याचा कर्ता ठरूं शकेल ? मग काव्यांत केशिराजाचें नांव कसें ?—या प्रश्नाला 'पंडितवासीं वत्साहरण केलें : तेथ अभंगीं सौजन्यें केसोबासानें घातलें'[30] असें वृद्धाचार उत्तर देतो, तर 'केसोबासाचें नाम सख्यत्वें मांडिलें असे'[31] असें अन्वयस्थळ म्हणतो. कविनामनिर्देशाच्या अनुषंगाने वृद्धाचाराच्या कांही पोथ्यांतूनै[32] आणखी एक आख्यायिका आढळते. ती अशी—'पंडितवासीं वत्साहरण केलें : तेथ अभंगी सौजन्यें केसोबासानें घातलें : मग केसोबासापुढां म्हणितलें : इतुकेनि केसोबास बहुत तोखले :' या वेळीं दामोदर पंडिताची पत्नी हिराइसा हींहि तिथे हजर होतीं. दामोदराने स्वतःच्या नांवाचा उल्लेख असलेली 'हा सारासार वस्तु विचारू–' ही ओवी जेव्हा म्हटली तेव्हा हिराइसें म्हणितलें : 'माझी आई आन वांझ : नीभेंत्सरता आन अहंकार !' याउपरि पंडितीं म्हणितलें, 'होए आमची चूकि :' म्हणौनि **वोवी पुसीली :**

वृद्धाचारांतल्या या आख्यायिकेच्या सत्यत्वाबद्दल मन साशंक झाल्यावाचून राहत नाही. कारण, 'वोवी पुसीली' हें वृद्धाचाराचें म्हणणें खरें असतें तर वत्साहरणाच्या सर्व प्रतींत ही ओवी कायम कशी राहिली ? ओवी पुसल्यावर ती एकाहि प्रतींत कायम राहिली नसती. पण, ज्या अर्थी ती 'वत्साहरणा'च्या सर्व प्रतींत आढळते त्या अर्थी वृद्धाचारांतल्या "पंडितीं 'वत्छाहरण' करण : केसवदेवश्रवणकरणीं अंतीं हीराइसीं चुकी ठेवणें" या आख्यायिकेचें सत्यत्व डळमळीत होतें.

हरिबास व सोंगोबास यांच्या 'अन्वयस्थळा'ने 'केसोबासाचें नाम सख्यत्वें मांडिले असे' असें सांगितलें आहे. पण मग त्यांत दामोदर पंडिताचें नांव कसें आलें ? केसोबासाचें नांव सख्यत्वाने मांडल्यावर दामोदर पंडिताने स्वतःच्या नांवाचा उल्लेख कसा केला ? अन्वयस्थळाने या प्रश्नाचें उत्तर दिलें नाही.

टीपकाराने–व फक्त टीपकारानेच–याचें स्पष्टीकरण असें केलें आहे की 'वोवी पूसत होते : परि हीराइसीं ठेविली.' ज्या हिराइसेने अहंकाराबद्दल दामोदराची कानउघाडणी केली व जिच्या कानउघाडणीमुळेच 'होए आमची चूकि' असें म्हणून दामोदर पंडित 'वोवी

३०. वृद्धा. ४; स्मृतिस्थळ (वा. ना. देशपांडे) पृ. ८२.

३१. म. सा. पत्रिका, अंक १०६.

३२. म. सा. पत्रिका, वर्ष ९ अंक ३, ऑक्टोबर १९३६, पृ. ८२.

पुसत ' होते, त्या हिराइसानेच दामोदराला ओवी पुसूं दिली नाही; किंबहुना तिनेच ती कायम ठेवली हेंहि तर्कसंगत वाटत नाही.

म्हणजे, दामोदर पंडित हा वत्साहरणाचा कर्ता असे ठरविणारे महानुभावीय ग्रंथांतले जे उल्लेख आहेत त्यांवरून दामोदर पंडित हाच वत्साहरणाचा कर्ता असें ठरूं शकत नाही.

## ' केशिराज मुनि ' हाच ' वत्साहरणा ' चा कर्ता

बाह्यपुराव्यापेक्षा अंतरंगपुरावा-व तोहि सर्व प्रतींत आढळणारा-हा नेहमीच अधिक महत्त्वाचा असतो. अंतरंग पुराव्याच्या अभावींच ' श्रीहर्षादेर्धावकादीनामिव धनम् ' असा काव्यप्रकाशांत उल्लेख असतांना[३३] व त्यावरून कांही टीकाकारांनी[३४] ' रत्नावलि ' नाटकाचें कर्तृत्व धावकाकडे दिलें असतांनाहि, अंतरंगपुराव्यावरून मात्र [३५] श्रीहर्ष हाच त्या नाटकाचा कर्ता ठरेल.

' वत्साहरणा 'च्या अंतर्गत पुराव्यावरून व कवीच्या स्वनिष्ठेवरून ' केशिराज मुनि ' हाच या काव्याचा कर्ता ठरतो हें मीं दाखविलेंच आहे. यापुढे महानुभाव-वाङ्मयाच्या इतिहासांत ' वत्साहरण ' हें काव्य ' वत्साहरण ' याच नांवाने निर्दिष्ट झालें पाहिजे व आजपर्यंतच्या परंपरेनुसार, दामोदर पंडिताला त्याचा कर्ता न मानतां, केशिराज मुनि हाच त्याचा कर्ता मानला गेला पाहिजे. केशिराज मुनि हाच प्रस्तुत काव्याचा कर्ता आहे, दामोदर पंडित नव्हे. ● ● ● [ अपूर्ण ]

३३. काव्यप्रकाश, १ काव्यप्रकाशाच्या एका काश्मीर संहितेंत 'श्रीहर्षादेर्बाणादीनामिव धनम् ' असा पाठ आहे.

३४. धावकः तन्नामा कविः । स हि श्रीहर्षनृपनाम्ना रत्नावलीनाम्नीं नाटिकां कृत्वा बहु धनं लब्धवानिति प्रसिद्धिरित्युद्योतादौ स्पष्टम् ।-का. प्र.

३५. रत्नावली १-५.

प्रा. वा. दा. गोखले

# मराठींतील देशी शब्द

अनन्तपारं किल शब्दशास्त्रं स्वल्पं तथायुर्बहवश्च विघ्नाः ।
यत्सारभूतं तदुपासितव्यं हंसो यथा क्षीरमिवाम्बुमध्यात् ॥

भारतांतील संस्कृतोद्भव किंवा द्राविडी भाषांच्या शब्दसंग्रहाचा विचार करतांना त्यांत प्रामुख्याने चार मूलभूत घटक दिसून येतात. ते म्हणजे ( १ ) तत्सम, ( २ ) तद्भव, ( ३ ) देशी किंवा देश्य, ( ४ ) विदेशी. या लेखांत देशी वा देश्य या घटकाबद्दल विशेष विचार करावयाचा आहे.

देशी[1] हा संस्कृतांत स्त्रीलिंगी शब्द असून त्याचा अर्थ संस्कृतभाषेहून भिन्न म्हणजे ग्राम्य किंवा विशिष्ट प्रांतीय भाषा असा आहे. कांहीं ग्रंथकारांनी देश्य वा देशीय असाहि पर्यायशब्द योजिला आहे. उदाहरणार्थ—देशीनाममाला, देशीप्रकाश, देशीय राजशेखरकोश, देशीय शब्द-संग्रह, देश्यानिघण्टु, देश्यनिदर्शन. संस्कृत साहित्यशास्त्रविषयक वाङ्मयांत 'देशी' हा शब्द वापरलेला आढळतो. काव्यादर्शांत दण्डीने भाषेचे प्रकार सांगतांना—

संस्कृतं नाम दैवी वागन्वाख्याता महर्षिभिः ।
तद्भवस्तत्समो देशीत्यनेकः प्राकृतक्रमः ॥ १·३३

प्राकृत भाषांपैकी कांहीं ' देशी ' म्हणून ओळखल्या जातात असें म्हटलें आहे. सरस्वती-कण्ठाभरणाचा कर्ता भोज याने देशभाषा आणि देश्यपद असे उल्लेख केलेले आहेत. विषयौचितीचा विचार चालू असतां

नात्यन्तं संस्कृतेनैव नात्यन्तं देशभाषया । २·१२

असा भाषाविषयक निर्बन्ध दिला असून

तद्देश्यामिति निर्दिष्टं यद्व्युत्पत्तिमत्पदम् । १·१४

या श्लोकांत पददोषाचें विवेचन आलें आहे. अव्युत्पत्तिमत् प्रकृतिप्रत्ययविभागशून्यं लोकमात्र-प्रयुक्तं पदमनादेयं भवति, अशी ' देश्य ' शब्दावर स्पष्ट टीका केलेली आहे.

साहित्यशास्त्रग्रंथांतील या उल्लेखांपूर्वीहि आर्यभाषांत घुसलेल्या आर्येतर शब्दांचा ऊहापोह शास्त्रीय ग्रंथांतून मोठ्या प्रमाणावर झालेला आहे. रणरणक, दोहद इत्यादि शब्द प्राकृतांतून संस्कृतांत आले यांत कांहीं विशेष नाही; पण पिक, नेम, तामरस इत्यादि विदेशी शब्दहि संस्कृतांत ठाण मांडून बसलेले दिसतात. शब्दशुद्धीवर आत्यंतिक भर देणाऱ्या मीमांसा-दर्शनांत या बाबतींत मोठें उद्बोधक विवेचन आलें आहे (१.३.८–१० या सूत्रांवरील भाष्य व वार्तिक पाहा). या लेखाचा तो विषय नसल्यामुळे नुसता उल्लेख केला आहे. सांप्रत देशी या शब्दाला एक विशिष्ट अर्थ प्राप्त झाला आहे. ज्या शब्दांचा व्युत्पत्तिदृष्ट्या संस्कृताशीं यत्किं-

---

१ मोनिअर वुइल्यम—संस्कृत-इंग्रजी कोश ( १८९९ )—देशी, देशीय, देश्य हे शब्द पाहा. पृ. ४९६, स्तंभ ३.

चितहि संबंध दाखवितां येत नाही ते सारे देशी शब्द होत असें सामान्यतः समजण्यांत येतें. असे देशी शब्द भारतांतील भाषांत कसे आले याचा अनेक विद्वानांनी आपापल्यापरी विचार केला आहे.

भिन्नभाषक लोक ज्या वेळीं कांहीना कांही कारणाने एकत्र येतात, व जेव्हा त्यांचा परस्परांशीं आर्थिक, राजकीय व्यवहार सुरू होतो त्या वेळीं व्यवहारसुलभतेसाठी हे लोक एकमेकांच्या भाषांतील शब्द वापरू लागतात. कांही काळ लोटल्यावर तात्पुरते म्हणून वापरलेले परक्या भाषांतील शब्द त्या त्या भाषांत कायम होऊन राहतात. आर्य लोक भारतांत आले ते अनेकदा गटागटांनी आले. त्यांची संस्कृति भारतांतील तत्कालीन लोकांच्या संस्कृतीपेक्षा उच्च होती, अनेक क्षेत्रांत हे लोक प्रगत झालेले होते भारतांतील मूल रहिवाश्यांनी आक्रमक आर्यांचा प्रतिकार केला हें खरें पण त्यांना अंतीं पराभूत व्हावें लागलें. आर्य आणि आर्येतर शेजारीं शेजारीं राहूं लागले. कांही ठिकाणीं युद्ध न करतांच हे दोन गट एकत्र आले. अशा रीतीने त्यांचे परस्पर व्यवहार सुरू झाले. कांही आर्येतरांना आर्यांच्या घरीं दास म्हणूनहि राबावें लागलें. हा संपर्क हळूहळू वाढत गेला. अशा वेळीं जो भाषाव्यवहार झाला, तो साहजिकच एकमेकांना समजण्यासारखा होणें आवश्यक होतें. यासाठीच आर्येतरांनी आर्यभाषा बोलण्याचा प्रयत्न केला असावा. उलट आर्येतरांना आपलें बोलणें समजण्यास सुलभ व्हावें म्हणून आर्यांनीहि आर्येतरांचे अनेक शब्द उचलले असावे. विशेषत: नवीन वस्तु, पूर्वी न पाहिलेल्या वनस्पति, पशुपक्षी इत्यादींचीं नांवें आर्येतरांच्या भाषांतून आर्यांना घेणें भाग पडलें असावें. याच क्रमाने आर्यभाषांत नकळत आर्येतर भाषांचे शब्द आले व त्यांची संख्या वाढत गेली.[२] आर्यलोकांच्या हिंदुस्थानांत वसाहती होत होत्या त्या वेळीं त्यांच्या परिसराला लागून भिन्न भाषा बोलणारे लोक राहत होत. यांपैकी ऑस्ट्रो-एशियाटिक कुळींतील मुंडा भाषा बोलणाऱ्या लोकांचा भला मोठा प्रांत भारताच्या उत्तर व मध्य भागीं होता. दक्षिण व पश्चिम दिशांकडे द्राविडी कुळींतील भाषा बोलणारे लोक वास्तव्य करीत होते.

आर्यभाषेचा या दोन भाषांशीं मोठ्या प्रमाणावर संबंध येऊन या भाषांतील अनेक शब्द आर्यांच्या भाषेंत कायम येऊन बसले. अणु, अरणि, कपि, कर्मार, कला, कितव, कुण्ड, गण, नाना, नीहार, पुष्प, बीज, मयूर, वल्गु इत्यादि वेदवाङ्मयांत आढळणारे शब्द आणि अटवी, आडम्बर, कुलाल, खड्ग ( गेंडा ), तण्डुल, मटची, मर्कट इत्यादि ब्राह्मणादि वाङ्मयांतील शब्द आर्येतर आहेत असें भाषाशास्त्रज्ञांचें मत आहे.[३] सांप्रतच्या देशी शब्दांचा उगम असा वेदवाङ्मयापर्यंत जाऊन पोहोंचतो असें म्हणावयास हरकत नाही.

श्री. के. अमृत रावे यांचें म्हणणें असें आहे की, आर्यांनीं द्राविडी भाषांतून अनेक क्षेत्रांतील शब्द उचलले असून एकच पदार्थवाचक एकच शब्द न घेतां त्यांनी अनेक शब्द घेतलेले दिसतात. उ. कीरो, कणैल्लो, कुन्तो, वायाडो हे सर्व शब्द पोपट या अर्थी असून त्या सर्वांचा वापर प्राकृतांत झाला आहे.

२. Przyluski—Pre-Aryan and Pre-Dravidian.

३. S. K. Chatterji–The Origin and Development of the Bengali Language. P. 42.

४. K. Amrita Row—The Dravidian Element in Prakrit.Ind. Antiquary. Vol. 46 P. 33-36.

अशा रीतीने प्राकृत भाषा व आधुनिक भाषा या सर्वांच्या शब्दसंग्रहांत देशी शब्दांचा घटक हा प्रमुखांपैकी होऊन बसला. जुन्या व्याकरणकारांनी 'देशी' या सदरांत सर्व अनुकरणवाचक शब्दांचा व सर्व अव्युत्पत्तिमत् शब्दांचा समावेश केलेला दिसतो. बारकाईने विचार केल्यास या 'देशी' शब्दांत अनेक तद्भव शब्दहि घुसडले गेले. कारण ह्या तद्भवांत एवढा बदल झाला आहे की त्यांचें मूळ संस्कृतांत असेल असा संभवहि या व्याकरणकारांना वाटला नाही.

या बाबतींत असेंहि झालें असेल की, गटागटांनी आलेले आर्य लोक जरी एकभाषा बोलणारे होते, तरी त्यांच्या बोलींत कालान्तराने बराच बदलहि झाला असावा. फार पूर्वी आलेल्या गटाच्या भाषेंतील कांहीं शब्द नंतर आलेल्या गटांतील लोकांना दुर्बोध झाले असतील, परंतु विशिष्ट गटाच्या बोलींत ते वापरांत होते. अशा रीतीने ह्या शब्दांच्या आर्यत्वाची स्मृतिहि नष्ट झाल्यामुळे त्यांचा संबंध आर्यभाषांतील शब्दांशीं लावणें दूरापास्त होऊन बसलें. साहजिकच या शब्दांना 'देशी' हें नांव प्राप्त झालें.

खरे देशी शब्द ते की जे द्राविडादि भाषांतून, त्याचप्रमाणे भारतांतील मूळचे रहिवासी–कोल, गोंड, संताळ, नाग, कातकरी–इत्यादिकांच्या बोलींतून सामाजिक संपर्कामुळे वैदिक भाषा, संस्कृत भाषा, प्राकृत भाषा, अपभ्रंश भाषा व आधुनिक भाषा या सर्वांत आले व त्या त्या भाषांशीं एकरूप बनले. मात्र या शब्दांचें प्रमाण बोलींत अधिक आहे; कारण ते तितकेसे शिष्टसंमत होऊं शकले नाहीत. अतएव साहित्यांत त्यांचा कमी प्रमाणांत उपयोग झालेला दिसतो.

या देशी शब्दांबद्दल अद्याप बरेंच संशोधन व्हावयाचें आहे. डॉ. कत्रे[५] म्हणतात, त्याप्रमाणे पुढील बाबतींत पुष्कळच कार्य झालें पाहिजे. (१) भारतांतील सर्व संबंधित भाषांतून समानत्वाने दिसून येणाऱ्या देशी शब्दांचें मूळ कोणकोणत्या भाषाशास्त्रांत आहे तें ठरविणें. (२) स्थल–काल–संदर्भ ध्यानांत घेऊन या शब्दांचा कसा निरनिराळा उपयोग केला जातो तें पाहणें. (३) निरनिराळ्या भाषाकुळींत दिसून येणाऱ्या प्रत्येक शब्दाचें शास्त्रशुद्ध विवेचन करण्याचा प्रयत्न करणें. (४) वरील तीनहि क्षेत्रांत मिळविलेल्या माहितीचा समन्वय करून तत्संबंधीचे निष्कर्ष तयार करणें. हें सर्व सिद्ध होण्याला द्राविडी व मुंडा कुळींतील भाषांचें तौलनिक व्याकरण तयार झालें पाहिजे व आर्य-भारतीय आणि आर्य-यूरोपीय भाषांच्या ज्ञानाने आज जो पल्ला गाठला आहे तेवढा तरी पल्ला द्राविडी–मुंडा कुळींतील भाषांच्या ज्ञानाने गाठला पाहिजे.

आधुनिक भारतीय भाषांतून दिसून येणारे 'देशी' शब्द ज्यावरून व्युत्पादितां येतील असे शब्द देणारे दोनच कोश आज उपलब्ध आहेत. (१) धनपालाचा **पाइयलच्छी** व (२) हेमचंद्राचा **देशीनाममाला**. धनपालाचा काल सामान्यतः (इ. स. ९७२) दहाव्या शतकाचा उत्तरार्ध असून हेमचंद्र इ. स. १०८८ ते ११७२ या अवधींत होऊन गेला. या कोशांची रचना शास्त्रशुद्ध आहे. प्राकृत व देशी शब्दांच्या अभ्यासाला अत्यंत उपयुक्त या दृष्टीनें यांचें मूल्य बरेंच मोठें आहे. धनपालाने आपल्या कोशांत तत्सम, तद्भव आणि देशी अशा सर्व शब्दांचा समावेश केल्यामुळे आजतरी त्याच्या अभ्यासावर जोर देतां येत नाही.

५. S. M. Katre — Historical Linguistics in Indo-Aryan. P. 154.

हेमचंद्राने तत्सम, तद्भव हे प्रकार पुष्कळच प्रमाणांत वगळले व शुद्ध देशी शब्दांचा विचार देशीनाममालेंत केलेला आहे.

कोशाच्या आरंभींच हेमचंद्राने[६] आपण कोणत्या शब्दांना देशी म्हणतों याचें स्पष्टीकरण केलें आहे.[७] प्रकृतिप्रत्ययादि भाग काढून ज्यांची संस्कृतापासून व्युत्पत्ति करतां येत नाही असे शब्द; जे संस्कृतोत्पन्न आहेत पण संस्कृत कोशांत ज्यांचा अर्थ–वाच्य वा लाक्षणिकहि–दिलेला नाही असे शब्द; संस्कृतांतून प्राकृतांत येतांना ज्या शब्दांचें अर्थान्तर झालें आहे असे शब्द आणि प्राकृतादि भाषांतून प्राचीन कालापासून चालत आलेले शब्द. या सर्वांना हेमचन्द्र देशी समजतो. असें असूनहि आपल्या कोशांत वरील विवेचन काटेकोर रीतीने पाळून हेमचंद्राने शब्दांची निवड केली आहे असें मात्र म्हणतां येत नाही.

देशी शब्दांच्या विवेचनांतील सारभूत गोष्टी पुढील होत. देशी शब्दांपैकी कांहींचें मूळ संस्कृतांत सापडणें शक्य आहे; परंतु अनेक शतकें त्यांचा बोलींत उपयोग झाल्यामुळे त्यांच्या स्वरूपांत फार मोठा बदल झाला, म्हणून संस्कृतांतून प्राकृतांत येतांना होणारे जे नियम आहेत त्या नियमांत हे शब्द बसत नाहीत.

कांही शब्द आर्य–यूरोपीय कुळींतील आहेत. या कुळींपासून उत्पन्न झालेल्या बोलभाषांत ते बदललेल्या रूपांत अजूनहि आढळतात.

कांही आर्यभाषांशीं नितराम् संबंध नसलेले, आर्यलोक भारतांत येण्यापूर्वी येथें राहणाऱ्या लोकांच्या बोलींतील असून, आर्य व आर्येतर यांच्या नित्याच्या संपर्काने आर्यभाषांत आलेले आहेत.

देशीनाममालेंत तर कांही फारशी व आरबी शब्दहि आले आहेत. इ. स. ६४१ मध्यें इराणमधून अनेक पारशी कुटुंबें हिंदुस्थानांत आलीं होतीं. अरब लोकांचेंहि स्वामित्व कांही वर्षे भारताच्या एका भागावर होतें. गझनीच्या महंमुदाच्या ( ९६७–१०३० ) स्वाऱ्या तर विख्यात आहेत. हा इतिहास ध्यानांत घेतला तर दत्थरो ( दस्त=हातरुमाल ) सारखे फारशी भाषेंतील शब्द हेमचंद्राने देशी म्हणून घेतले तर त्यांत विशेष गैर दिसत नाही.

या कोशाच्या साहाय्याने मराठींत विशेषतः बोलींत दिसून येणाऱ्या कांही देशी शब्दांची यादी पुढे दिली आहे. मराठी शब्द व तद्वाचक कोशांतील शब्द हे जाड टाइपांत दिले असून, हेमचंद्राने दिलेला शब्दाचा अर्थ संस्कृतांत दिला आहे. पुढे कंसांत तो शब्द

६. हेमचंद्र हा प्रसिद्ध जैन पंडित होता. त्याने जैनधर्मीय ग्रंथ लिहिले असून व्याकरण, छंद, कोश, काव्य या क्षेत्रांतहि साहित्यनिर्मिति केली; म्हणून त्याला ' कलिकालसर्वज्ञ ' अशी पदवी मिळाली. विद्याप्रेमी शिवोपासक चालुक्य राजा जयसिंह सिद्धराज याने हेमचंद्राला आश्रय दिला होता. त्याच्या मृत्यूनंतर कुमारपाल गादीवर आला. याला हेमचंद्राने जैन धर्माची दीक्षा दिली. हेमचंद्राने जैन धर्माची व वाङ्मयाची फार मोठी सेवा केली आहे.

७ णीसेसदेसिपरिमलपल्लविअकुऊहलाउलत्तेण ॥
विरइज्जइ देसीसद्दसंगहो वण्णकमसुहओ ॥ २ ॥
जे लक्खणे ण सिद्धा ण पसिद्धा सक्कयाहिहाणेसु ।
ण य गउणलक्खणासत्तिसंभवा ते इह णिबद्धा ॥ ३ ॥
देसविसेसपसिद्धीइ भण्णमाणा अणन्तया हुन्ति ।
तम्हा अणाइपाइअपयट्टभासाविसेसओ देसी ॥ ४ ॥

कोणत्या भाषेंत मुळांत असावा तें दर्शविलें आहे. शेवटचे अंक देशीनाममालेचा वर्ग व श्लोक दाखविणारे आहेत. मुंबईराज्य शिक्षणखातें क्र. २७ हेमचंद्राची देशीनाममाला—बॉम्बे संस्कृत सीरीज १९३८ ही प्रत आधारभूत आहे.

शब्दावली विद्वानांच्या विचारासाठी दिली आहे. कांही शब्दांच्या बाबतींत मतांतर होणें शक्य आहे. यादींतील बहुसंख्य शब्द मोलस्वर्थ मराठी—इंग्रजी कोशांत आहेत. जे नाहीत त्यामागे × खूण केली आहे. कंसांत दिलेल्या संभाव्य व्युत्पत्तींना उपरिनिर्दिष्ट देशीनाममालेंतील परिशिष्टें व प्रो. ब्लोककृत मराठी भाषेचा विकास या ग्रंथांतील व्युत्पत्तिसूचि यांचा आधार आहे.

( **संक्षेप :—** का. कानडी; कों. कोंकणी; ता. तामिळ; ते. तेलगु; त्रिव्या. त्रिविक्रम-व्याकरण; द्रा. द्राविडी, सं. संस्कृत. )

**अक्का, आक्का—अक्का** भगिनी । १.६ ( द्रा. अक्क. )

**अंगठी—अंगुत्थलं** अंगुलीयम् । १.३१ ( Pers—angshtai, Pehl.-angust. Zend-angusta. )

**अडाण—अणडो** जारः । १.१८—**अणाडो** जारः । १.१८

**अण्णा—अण्णओ** तरुणः । १.५५ ( द्रा. अण्ण. )

× **अण्णी—अण्णी** देवरभार्या, ननान्दा, पितृष्वसा । १.५१

**अंबाडा, आंबाडा—**( स्त्रियांची विशिष्ट केशरचना ) **आमेलो, आमोडो**—जूटः । १.६२ ( सं. आपीड. )

**अळशी** ( जवस )—**अलसी** क्षुमा । १.२०

**आघाडा, अघाडा—**( एक वनस्पति )—**अग्घाडो** अपामार्गः । १.८

**आड** ( विहीर, कुवा )—**अडो** कूपः । १.६ **अयडो** कूपः । १.१८ ( सं. अवट )

× **आडणी—**( कों. दाराची कडी)—**ओहडणी** फलहकार्गला । १.१६०

**आत** ( आत्या )—**अत्ता** जननी, पितृष्वसा, श्वशुरभार्या । १.५१ ( द्रा. अत्त. )

**आप्पा** ( अप्पा )—**अप्पो** पिता । १.६ ( द्रा. अप्पा. )

**आभ** ( कों. आभाळ, ढग )—**अब्भपिसाओ** राहुः । १.४२

× **आलटपालट — अल्लटपल्लटं** पार्श्वपरिवर्तनम् । ( त्रिव्या. अणट्टपल्लट्ट.) १.४८

**इरलें, इरली** ( पानें कामट्या वगैरेंनी केलेली छत्री )—**इल्ली** वर्षत्राणम्, **इल्लीरं** वृष्टिवारणम् । १.८३ ( द्रा. पुली ? इल्लु ? )

**इल्ला** ( कोंकणी इल्लो = थोडा )—**इल्लो** दरिद्रः । १.८२ ( द्रा. इल्ल. )

**उकरडा, उकिरडा, उकर, उकीर** ( केरकचऱ्याचा ढीग )—**उक्कुरुडी, उक्कुरुडो** अवकरराशिः । १.११० **उक्केरो** समूहः । १.९६ ( सं. उत्कर. )

**उकाडा** ( उष्मा ) **उक्कोलो** घर्मः । १.८७

**उचल्या** ( भामटा )—**उच्छंटो** द्रुतचौर्यम् । **उच्छटो ओच्छटो** चोरः । १.१०१

× **उचलेगिरी — उच्छडिअं** चोरितं वस्तु । १.११२

**उजाड** (ओसाड)—**उज्जडं** उद्वसम् । १.९६ ( सं. उज्ज्वल. )

**उडीद** ( एक धान्य ) **उडिदो** माषधान्यम् । १.९८ ( ता. उळुंदु, का. उद्दु. )

**उतरड, उतरंड** ( खाली मोठें व वर लहान अशा रीतीनें एकावर एक भांडीं ठेवून केलेली रचना)—**उत्तिरिविडी** उर्ध्वोर्ध्वम् । भाण्डादेः स्थापनम् । १.१२२

**उभव, उदव** — ( ऊठ, जागा हो ) **उद्धवओ** उत्क्षिप्तः । १.१०६ ( सं. उर्ध्व, उदय )

**उंदीर—उंदुरो** आखुः । १.१०२ ( तत्सम )

उफाडा, उफाड्याची–उफ्फुंडिअं आस्तृतम् । १.११३
उंबरा ( उंबरठा ) – उम्मरो गृहदेहली । १.९५ (ता. उम्मारपदि); उंबरं देहली । १.९० ( सं. उदुंबर )
उभळणें (नवीन जात्यांत थोडें धान्य दळणें ) –उब्भालणं शूर्पादिनोत्पवनम् । १.१०३
उमळ, उभाळी ( खोकल्याची उसळी ) – वरीलप्रमाणें.
उभा–उब्भं ऊर्ध्वम् । १.८६ ( सं. ऊर्ध्व )
उमड, उमळ ( पुष्कळ पाऊस पडल्यामुळे जमिनींतून झरे वाहूं लागणें ) – उम्मंडं उद्वृत्तम् । १.१२४
उळथापालथ—उत्थल्लपत्थल्ला पार्श्वद्वयेन परिवर्तनम् । १.१२२ ओत्थल्लपत्थल्ला इत्यपि.
उलाढाल, उलेंढालें ( घालमेल ) – उल्लेहडो लंपटः । १.१०४
उखाण ( उसाचें शेत ) – उच्छुरणं इक्षुवाटः । १.११७
उवेर, उवेरी (अवशिष्ट भाग) – उव्वरिअं अधिकम् । १.१३२ ( सं. उर्वरित )
उसें, उशी – ऊसयं उपधानम् । शयने मस्तकोत्तम्भनाय यन्निवेश्यते । १.१४०
ऊ, ऊं – ( केसांतील एक जीव ) – ऊआ यूका । १.१३९ ( सं. यूका )
ऊब – उव्वा घर्मः । १.८७
ऊंस – उच्छू इक्षुः । १.८५ ( सं. इक्षु )
एक्की ( मुलांच्या भाषेंतील मैत्री ) – एक्को स्नेहपरः । १.१४४ ( सं. एक )
× एठ्ठा ( चित्पा. येथे ) – हिट्ठो अधः । ८.६७ ( सं. अधः )
ओक ( वांती ) — ओक्किअं वान्तम् । १.१५१
ओगळ, ओघळ – ओग्गलो अल्पं स्रोतः । १.१५१ ( सं. उद्गार )
ओझें – वोज्झओ भारः । ७.८०
ओडण, ओढण, ओढणी – ओड्ढणं उत्तरीयम् । १.११५
ओढण ( लुगड्याचा पदर ) — ओहाडणी पिधानी । १.१६१
ओढाण, अवढाण ( कों. अन्नद्वेष )– अंगवड्ढणं रोगः । १.४७
ओप ( उजाळा )–ओप्पा शाणादिना मण्यादेर्मार्जनम् । १.१४८
ओवी ( मराठींतील एक वृत्त )–ओविअं आरोपितं रदितं चाटु मुक्तं हृतं चेति पञ्चार्थं । १.१६७. मानसोल्लासांत ओवीचें महाराष्ट्रेषु योषिद्भिः ओवी गेया तु कण्डने ( श्लो. २०५२) असें वर्णन आहे. ओवीचा 'ओवीअं'शीं संबंध लावावा का ?
ओस ( पडणें )–ओसण्णं त्रुटितम् । १.१५६ ( सं. अवसन्न. )
ओसरा ( ओटी, पडवी )–ओसरिआ अलिन्दः । १.१६१
ओसरी (गाईची पडवी)–ओसारो गोवाटः । १.१४९
ओहटी– ओहट्टो अपसृतः । १.१६६
ओहर (कों. समुद्राचा फाटा) वोहारं जलस्य वहनम् । ७.८१
ओहळ ( लहान ओढा )–वहोलो लघुजलप्रवाहः । ७.३९
ओळ–ओली पङ्क्तिः । १.१४८ ( सं. आवलि किंवा आलि. )
कच ( अडचण )-कच्चं तथा कोडुंबं कार्यं । २.२
कचरा–कच्छरो पङ्कः । २.२.
कटार, कातर–कट्टारी क्षुरिका । २.४
कडची ( लहान कढई, इतर संबंधी भाषांत पळी )–कडच्छू अयोदर्वी । २.७
कडतर ( जुनी फाटकी टोपली, पंखा, चटई इ. )–कडंतरं जीर्णशूर्पाद्युपकरणम् । २.१६
कडप ( गवताची लहान गंज )–कडप्पो निकरः । २.१३
कणीस–कणिसं धान्यशीर्षम् । २.६ ( सं. कणिश )

कमटा–ठा (लहान भांडें)–कमढो पिठरम्। २.५५ (सं. कमठ)

करटा, करंटा (अभागी, कृपण) करडो काकादिः। २.५५ (सं. करट)

करवंद, कारंदा (कों. करांदा)–करवन्दीए सीसणही। ८.३५

कळक, कळंक (बांबू)–कलंको वंशः। २.८

काईल (कढई)–कयलं अलिञ्जरः। २.४

काऊ, कावळा–कायलो काकः। २.५८ (सं. कातर, काक)

काटक (कणखर) – कक्खडो पीनः। २.११

कापडी (कावड घेऊन तीर्थयात्रा करणारा) –कंपडो पथिकः। २.७

कालवड, कालव्हड (पाडी) – कल्होडी वत्सतरी। २.९

काहली, काहिली, काहील — काहली तवणीति प्रसिद्धमपूपादिपचनभाण्डम्। २.५९

× काळू (कों. ठक) – कालओ धूर्तः। २.२८

कीलच, कीलीच (कडिपाटाच्या फळ्यांचे तुकडे) – किलिंचं लघुदारु। २.११

कींव – किंपओ कृपणः। २.३१

कीर (पोपट) – कीरो शुकः। (सं. कीर द्रा. किली) २.३०

× कुकुला (लहान मुलांना प्रेमाने वापरावयाचा शब्द) – कुकुला नववधूः। २.३३

कुंडला–ली–लें (कों. वाटोळें मातीचें भांडें) कुंतली करोटिकाख्यं परिवेषणोपकरणम्। २.३८

कुला, कुल्ला, कुल्हा – कुल्लो ग्रीवा असमर्थच्छिन्नपुच्छश्चेति त्र्यर्थः। २.६१ (ते. कुल्लु) कूवलं जघनवस्त्रम्। २.४३

कूड – कुडयं लतागृहं। २.३७ (सं. कूट, कुटङ्क, कुड्य)

कोटंबा–बी (वाघ्याचें लाकडी भिक्षापात्र) – कोट्टिंबो द्रोणी। २.४७

कोड (कौतुक) – कुड्डं आश्चर्यम्। २.३३

कोडें (पणती) – कोडिअं लघुशरावः। २.४७

कोथळा — कोत्थलो कुशूलः। २.४८ (ते. कोट्टु)

कोन (कोपरा, चाळंतपण) – कोण्णो गृहकोणः। २.४५ (सं. कोण)

कोमणें (कोमेजणें) – कुम्मणं म्लानम्। २.४०

कोल (नामर्द) – कुल्लो असमर्थः। २.६१

कोल्हा – कुल्हो शृगालः। २.३४ कोल्हुओ शृगालः। २.६५

कोहळा–कोहाळा—कोहली कूष्माण्डी। २.५०

कोळी – कोलिओ तन्तुवायः। २.६५ (सं. कौलिक)

कोळें (बैलाचें वशिंड) – कोलो ग्रीवा। २.४५ कुल्लो ग्रीवा। २.६१

खडण, खडीण (नाठाळ) – खड्डिओ मत्तः। २.६७

खर (बोचणारा) — खरडिअं रूक्षम्। २.७९

खमखम, खुमखुम, खवखव – खम्मक्खमो संग्रामः मनोदुःखम्। २.७९

खवा, खवाटा (खांद्याचा सांधा) – खवओ स्कंधः। २.६७

खळ (घारग्याकरितां भिजविलेलें पीठ) – खली तिलपिण्डिका। २.६६ (सं. खल)

खाई (खळगा)–खाइआ परिखा। २.७३ (सं. खात)

खाटिक–खट्टिको सौनिकः। २.७० (ते. कटिक)

खांड (मिशा)–खडू श्मश्रु। २.६६ (द्रा. गड्डु किंवा कट्ट)

खाडा, खडा, खड्डा–खड्डा खानिः। पर्वतखातमित्यन्ये। २.६६ (सं. खात)

खात, खत–खण्णं खातम्। २.६६

खाद (खाणें)-खद्धं भुक्तम् । २.६७
खाल (साल, कातडें)-खल्ला चर्म । २.६६
खिजविणें-खिज्जिअं उपालम्भः । २.७४ (सं. खिद्)
खिडकी-खडक्की लघुद्वारम् । २.७१ (ते. किटिकी)
खोड (झाडाचा बुंधा)-खोडो सीमाकाष्ठम् । २.८०
खोप, खोंप (लहान झोंपडी)-खुंपा तृणादिमयं वृष्टिनिवारणम् । २.७५
खोली-खुल्लं कुटी । २.७४
गड-गढो दुर्गम् । २.८१
गडगडणें, गडाडणें-गडयडी वज्रनिर्घोषः । २.८५
गंडरी, गंडेरी, गंडोरी-गंडीरी इक्षुखण्डम् । २.८२
गवत-गवत्तं घासः । (सं. गो+अद्) २.८५
गांजलेला-गंजिल्लो विधुरः । २.८३
गाठोळें, गाठोळी, गाठोडें-गेंठुल्लं स्तनयोरुपरि वस्त्रग्रन्थिः । २.९४
गाडी-गड्डी गन्त्री । २.८१ (का. गाडी)
गांडू (दुबळ)-गाडिओ विधुरः । २.८३
गातडी, गाताडी-(गव्हाणीचें लाकूड; देवळांतील मूर्तीपुढील आडवें लाकूड) गत्ताडी गवादनी । २.८२
गादी - गड्डं शय्या । २.८१
× गायरी (कों. शेण साठविण्याचा वाटोळा खड्डा) गायरी गर्गरी । २.८९
गावडा (गांवांतील अधिकारी) - गामउडो ग्रामप्रधानः । २.८९ (सं. ग्रामणी)
गुंडाळा, गुंडाळी - गुडदालिअं पिण्डीकृतम् । २.९२
गुफा, गुंफा - गुंफो गुप्तिः । २.९०
गोंड (वण) - गोंडं काननम् । २.९४
गोवंड (जनावराच्या पायाच्या खुणा) — गोअंटा गोचरणाः । २.९८
गोवरी - गोवरं करीषम् । २.९६
गोळी - गुलिआ कन्दुकः । २.१०३ (सं. गुटिका)
घागर - गग्गरी गर्गरी । २.८९
घागरा (स्त्रियांचा परकर) - घग्घरं जघनस्थवस्त्रभेदः । २.१०७
घाट - घट्टो नदीतीर्थम् । २ १११
घार (पक्षीविशेष) - घारी शकुनिकाख्यः पक्षी । २.१०७
घूक (घुबड) - घूओ उलूकः । २.११०
घेर, घेरा - घारो प्राकारः । (ते. गोड)
घोडा - घोडो अश्वः । २.१११
× घो, घोव, घोहो (कों. नवरा) - गोहो ग्रामप्रधानः पुरुषः इत्यन्ये । २.८९
घोसाळी - घोसाली शरदुद्भवो वल्लिभेदः । २.१११
चवडा (पंजा)-चवेडी श्लिष्टं करसम्पुटम् । ३.३
चांगला - चंगं चारु । ३.१
चाटू - (पळी) चट्टू दारुहस्तः । ३.१
चावल (हिन्दी तांदूळ)-चाउला तण्डुला । ३.८
चिखल - चिक्खलो कर्दमः । ३.११
चिंच - चिंचा चिंचिणी अम्लिका । ३.१० (ते. चिंत)
चितळ (ठिपक्यांचा काळवीट) - चित्तलं मण्डितम् । ३.४
चिरचिर, चिरचिरां - चिरिचिरा, चिरिंचिरा जलधारा । ३.१३
चिलीं (पिलीं) - चिल्लो बालः । ३.१०
चुकटी (चिमूट) - चुक्को मुष्टिः । ३.१४
चुंबळ, चुंभळ (ओझ्याखाली डोक्यावर ठेवलेली चिरगुटाची गुंडाळी) - चुंभलो शेखरः । ३.१६
चुडी, चूड (उजेडाकरितां पेटविलेली जुडी)-चुडुली उल्का । ३.१५
चुडा-चूडो वलयावली । (सं. चूडक) ३.१८
× चूण, चून (कों. किसलेलें खोबरें)-चुण्णइओ चूर्णाहतः । ३.१७ (सं. चूर्ण)

चेड, चेडा, चेला–चेडो बालः। ३.१०
(सं. चेट)
चोचला (लाड)–चुंचुलिअं सतृष्णता। ३.२३
चोज–चुज्जं आश्चर्यम्। ३.१४
चौक– चउक्कं चत्वरम्। ३.२ (सं.चतुष्पथ, चतुष्क)
छप्पर–छिप्पीरं पलालः। ३.२८
छविला, छबेला–छाइल्लो सुरूपः। ३.३५
छास (ताक)–छासी तक्रम्। ३.२६
जडित–जडिअं खचितम्। ३.४१
जरड, जरंड (वृद्ध)- जरंडो वृद्धः जरडो इत्यन्ये। ३.४०
जुवारी, ज्वारी-जोवारी धान्यम्। ३.५०
जेवणा (उजवा हात)–जेमणयं दक्षिणमङ्गम्। हस्तादि। ३.४८
जोपावणें (देखरेख करणें)–जोअणं लोचनम्। ३.५०
जोव, जौव (वीज)–जोई विद्युत्। ३.४९
झड (सारखा लागत असलेला पाऊस)–झडी निरंतरवृष्टिः। ३.५३ (द्रा. जडि)
झळ (उन्हाची तिरीप) (झळव, झळकणें)–झला मृगतृष्णा। ३.५३
झांकर (दाट झाडी)–झंकरो तुष्कतरुः। ३.५४
झांट–झंटी लघूर्ध्वकेशाः। ३.५३
झाड – झाडं लतागहनम्। ३.५७ (सं. झाट)
झाडी–जाडी गुल्मम्। ३.४५
झिल्ली (मुरकुट)–झिल्लिरिआ मशकः। ३.६२
झूट (लबाडी)–झुट्टं अलीकम्। ३.५८
झेंडू (एक फूल, सर्पदंशामुळे झालेली रक्ताची गुळणी) झेंडुओ कन्दुकः। ३.५९
झोंट, झोंड (निर्लज्ज)–झोट्टी अर्धमहिषी। ३.५९
झोंट (कपाळावर येणारी केसांची बट)–झुंटणं प्रवाहः। ३.५८
झोडणें – झोडिओ व्याधः। ३.६०
झोळी – झोलिआ झोलिका। ३.५६
(सं. झोलिका, झौलिक)
टंक – (टांकी लावण्याची छिन्नी) – टंको खड्गः। ४.४
टार, टार [गट] – टारो अधमतुरङ्गः। ४.२
टिरटिर (क्षणभंगुर तेजस्विता, विजेसारखें चमकून जाणें) – टिरिटिल्लइ भ्राम्यति। ४.३
टिका, टिक्का (टिळा) – टिक्कं तिलकम्। ४.३
टोळ, टोळ [भैरव] – टोलो शलभः पिशाच इत्यन्ये। ४.४
ठुंठण (थोटुक, कापलेला हातापायाचा तुकडा) – टुंटो छिन्नकरः। ४.३
डंभ (दंभ) – डंभिओ द्यूतकार :। ४.८
(सं. दम्भ)
डांग (नाशिकजवळील डोंगराळ प्रदेश) – डग्गलो भवनोपरि भूमितलम्। ४.८
डाव (करवंटीची पळी) – डुंघो उदञ्चन–विशेषो नालिकेरमयः। ४.११
डावा – डव्वो वामकरः। ४.६
डाहळ, डाहळा (फांदी) – डाली शाखा। ४.९
डाळ (रास, ढीग) डलो लोष्टः। ४.७
डिगरो (मुलगा) – डहरो शिशुः। ४.८
डोई, डोयो (डोकें) – डोओ दारुहस्तः। ४.११
डोंगर – डुंगरो शैलः। ४.११
डोंव – डुंबो श्वपचः। ४.११
डोळा – डोलो लोचनम्। ४.९ (सं. दोल्)
डोळी, डूळी – डोला शिबिका। ४.११
ढांकणी, झांकणी – ढंकणी पिधानिका। ४.१४
ढिला – ढेल्लो निर्धनः। ४.१६
ढेंकें, ढेका, डेका (तेलाच्या घाण्याच्या लाटेवर आडवा असलेला लाकडाचा तुकडा) – ढेंका कूपतुला। ४.१७
ढेंकर – ढेंका हर्षः। ४.१७

**ढेंकुण–ढेंकुणो, ढंकुणो** मत्कुणः । ४.१४

**ढेर** (मोठें पोट)–**डहरी** आलिञ्जरः । ४.७

**तडफड, तगमग – तडमडो,** क्षुभितः । ५.७ ( ते. तडवडु )

**तडफड–तडफडिअं** परितश्चलितम् । ५.९

**तंटा – तंटं** पृष्ठम् । ५.१ ( ते. तुण्टी )

**तरवड** ( एक झाड ) – **तरवट्टो** प्रपुनाटः तडवडा आउलिवृक्षः । ५ ५

**तवा** ( तळण्याचें भांडें ) – **तमो** शोकः । ५.१ ( सं. तापक )

**तळणें – तलिमो** भ्राष्ट्रः । ५.२०

**तळें – तल्लं** पल्वलम् । ५.१९

**ताट, ताटी** ( कुंपण ) – **तट्टी** वृत्तिः । ५.१ ( द्रा. तट्टि )

**तांबेरा, तांबोरा** ( धान्याचा रोग ) — **तंबिरा** गोधूमेषु कुङ्कुमच्छाया । ५.५

**तिडें,** ( ढुंगण ) – **तिय** ( हा पाइयलच्छी मधला शब्द आहे. )

**तुणतुणें — तुणओ** झुंखाख्यस्तूर्यविशेषः । ५.१६

**तूप — तुप्पो** म्रक्षितः स्निग्धः । ५.२२ ( द्रा. तुप्प )

**तेवणें** ( कों. विरघळणें, पाघळणें ) – **तिमिणं** आर्द्रदारुः । ५.११

**थांग** ( नक्की जागा ) – **थग्घो** गाधः । ५.२४ ( पाइयलच्छीमध्ये याचा अर्थ खोल )

**थारा – थारो** घनः । ५.२७

**थिटा** ( आंखुड ) – **फिट्टो** वामनः । ६.८४

**थिल्लर** ( डबकें ) — **छिल्लरं** पल्वलम् । ३.२८

**थुकणें–थुंकणें – थुक्किअं** अम्बूकृतम् । ५.२८

**थेंब, थेम – थेवो** बिन्दुः । ५.२९

**थोर — थोरो** क्रमपृथुपरिवर्तुलः । ५.३० ( सं. स्थूल )

**दंड** ( कपड्याचे दोन भाग एकत्र केलेली शिवण ) – **डंडं डंडी** सूच्या संघाटितानि वस्त्रखण्डानि । ४.७

**दांडा** ( रस्ता उ. उभा दांडा ) – **डंडओ** रथ्या । ४ ८

**दरवडा, दरोडा – दडवडो** धाटी । ५.३५

**दस्त रुमाल – दत्थरो** हस्तशाटकः । ५.३४ ( हा शब्द पर्शिअनमधून देशीनाममालेंत आला. )

**दाट – संदट्टं** संदष्टयं । ८.१८

**दुध्री** ( कों. भोपळा ), **दुधीण** ( वेल ) – **दुध्दिणिआ दुद्धिणी** तुम्बी । ५.५४

**दुही – दुहं** असुखम् । ५.४२

**दोर — दोरो** कटिसूत्रम् । ५.३८ ( सं. दोरक ) । **दवरो** तन्तुः । ५.३५

**धणी** ( इच्छा, तृप्ति ) – **धणी** पर्याप्तिः । ५.६२ ( सं. धन )

**धमाल – झमालं** इन्द्रजालम् । ३.५३

**धव** ( पति ) – **धओ** पुरुषः । ५.५७ ( सं. धव )

**धारा** ( तीर्थ ) – **धारा** रणमुखम् । ५.५९

**धू, धुवडी** ( कों. पुतणी ) **धूआ** दुहिता । ५.६० ( सं. दुहितृ )

**नड** ( लेला ) – **णडिओ** वञ्चितः खेदितः इत्यन्ये । ४.१८

**नथ – णत्था** नासारज्जुः । ४.१७

**नंदी – णंदी** गौः । ( सं. नन्दिनी ) ४.१८

**नाक – णक्को** घ्राणम् । ४.४६

**नाना** ( आदरार्थी नांव ) – **णण्णो** ज्येष्ठो भ्राता । ४.४६ ( द्रा. अन्न )

**नांद** ( रुंद तोंडाचें मोठें भांडें ) – **णंदं** कुण्डाख्यो भाण्डविशेषः । ४.४५

**निखारडा** ( अनाथ ) – **णिक्खुरिअं** अदृढम् । ४.४०

**निज** ( लेला ) — **णिज्जो** सुप्तः । ४.२५ ( सं. निद्रा )

**निझूर** ( अशक्त माणूस, निकस जमीन ) — **णिज्झरं, णिज्झूरं** जीर्णम् । ४.२६

**निंदणी** ( तण काढणें ) – **णिंदिणी** कुतृणोद्धरणम् । ४.३५

**निपट** ( सर्वस्वीं ) — **णिप्पट्टो** अधिकः । ४.३१

**निभगणें** ( तडकणें ) – **णिब्भुग्गो** भग्नः । ४.३२

**निवाणें** ( नाश ) – **निव्वाणं** दुःखकथनम् । ४.३३ ( सं. निर्वाण )

**निसण, निर्शाण** ( शिडी ) – **णीसिणिआ** निःश्रेणी । ४.४३

**पक्का** ( निर्ढावलेला ) – **पक्को** दृप्तः । ६.६४ ( सं. पक्व )

**पडकय** ( कों. शेतकऱ्यांची देवघेव ) — **पडिक्कओ** प्रतिक्रिया । ६ १९

**पडवी** ( ओसरी ) – **पडवा** पटकुटी । ६.६

**पथारी** ( अंथरूण, बैठक ) – **पथारी** प्रस्तरः । ( सं. संप्रस्तार ) ६.६९

**परडें** – **परिअडी** वृत्तिः । ६.७३

**परळ** ( मातीचें भांडें ) – **परिअली** स्थालम् । भोजनभाण्डमिति । ६.१२

**परीट** – **परिअट्टो** रजकः । ६.१५

**पळ्हें, पळें** ( कापसाचें शेत ) — **पलही** कर्पासः । ६.४

**पाखर** ( हत्ती इत्यादिकरितां चिलखत किंवा झूल ) – **पक्खरा** तुरगसंनाहः । ६.१०

**पांघरूण** — **पंगुरणं** प्रावरणम् । ६.२९ ( सं. प्रावरण )

**पाज** ( डोंगरांतील पाऊलवाट ) – **पज्जा** अधिरोहिणी । मार्गवाचकस्तु पद्याशब्द–भवः । ६.१

**पाडशी** ( वांझोटी ) – **पडिच्छिया,** चिर-प्रसूता महिषी । ६.२१

**पाडस, पाडसी** – **पड्डत्थी** बहुदुग्धा दोहन–हारिणी । ६.७०

**पाडा** ( खोंड ) – **पडोओ** बालः । ६.९

**पांडुरंग** * – **पंडरंगो** रुद्रः । ६.२३ ( सं. पाण्डराङ्ग )

* पंढरपूरच्या विठोबाला पांडुरंग हें नांव आहे. कांहींच्या मतें हल्लीच्या विठ्ठल-मंदिराच्या ठिकाणीं पूर्वी शिवालय होतें. पंडरंग शब्दाचा अर्थ रुद्र म्हणजे शिव असा आहे. अर्थात् विठ्ठल-वाचक पांडुरंग शब्द पंडरंग-वरून आला असावा.

**पातळ** – **पत्तलं** कृशम् । ६.१४

**पारद** ( ध ) – **परद्धं** पीडितम् । ६.७०

**पुंड** – **पुअंडो** तरुणः । ६.५३ ( सं. पौगण्ड )

**पेंडें** – **पेंडं** वलयः । ६.८१ ( द्रा. पेंडर )

**पेड** ( झाडाभोवतीचा उंचवटा ) – **पेंडं** वलयः ६.८१

**पेंड** ( गळिताच्या धान्यांतून तेल काढून राहिलेला भाग ) – **पेंडवालं** पिण्डीकृतम् । ६.५४

**पेंढी** ( लहान गठ्ठा ) – **पेंडवालं** पिण्डी-कृतम् । ६.५४

**पेर** ( मळण्याकरितां खळ्यांत पसरलेलें भात ) – **पयरो** शरः । ६.१४ ( सं.प्रदर )

**पेहरण, पेरण** ( सदरा, कुडतें ) – **परिहणं** परिधानम् । ६.२१ ( सं. परिधान )

**पैठा** ( प्रवेश ) – **पइट्ठो** मार्गः । ६.६६

**पोट** – **पोट्टं** उदरम् । ६.६० ( द्रा. पोट्ट )

**पोटळा–ळी** — **कुण्टी पोट्टलं** वस्त्रनिबद्धं द्रव्यम् । २.३४

**पोत** ( काचेचे मणि ) – **पोत्ती** काचः । ६.६०

**पोळ** – **पोआलो** वृषभः । ६.६२

**पोळा** — **पोअलओ** आश्विनमासोत्सवः । ६.८१

**फरा** ( खांद्याचें हाड ) – **फरओ** फलकः । ६.८२

**फडा** – **फडं** फणः । ६.८६ ( सं. फट )

**फसफसणें** – **फोसो** उद्गमः । ६.८६

**फाग** ( होळीच्या सणांतील कृष्णाचीं गाणीं ) – **फग्गू** वसन्तोत्सवः । ८.८२

**फांफूं** ( मंत्रतंत्र ) – **फोंफा** भीषयितुं शब्दः । ६.८६

**फुकट, फुका** – **फुक्का** मिथ्या । ६.८४

**फेल** ( फोलकट ) – **फेल्लो** दरिद्रः । ६.८५

**फोडणी** – **फोडिअयं** धूमितं । शाकादि । ६.८८

**फोफाटा** – **पप्फाडो** अग्निभेदः । ६.९

**बरू, बोरू** – **वरुअं** इक्षुसदृशं तृणम् । ६.९१

**बाप, बापू** – **बप्पो** पिता । ६.८८

**बावरी, भावरी** (कों. झिंज, विसकटलेले केस, हजामत) – **बव्वरी** केशरचना । ६.९०
**बावर, वावर** – **बोव्वं** क्षेत्रम् । ६.९६
**बाहुला, बावला** – **बाउल्ली** पाञ्चालिका । ६.९२
**बिवळा** (एक झाड)- **वीअओ** असनवृक्षः । ६.९३
**बुका, बुक्का** ( ठोंसा ) – **बुक्का** मुष्टिः । ६.९४
**बेडा** ( तराफा ) **बेडो** नौः । ६.९५
**बेळकें** (दोन फांद्यांचें दांडकें ) – **वेली** स्थूणा । ६.९५
**बैल** – **वइल्लो** बलीवर्दः । ६.९१ (सं.बलीवर्द)
**बोकड** –**बोक्कडो** छागः । ६.९६
**बोडो** – ( चित्पावनी भाषा, मुलगा ) – **बोडो** तरुणः । ६ ९६
**बोंड** – **बोंडं** चूचुकम् । ६.९६
**भाऊ** – **भाओ** ज्येष्ठभगिनीपतिः । ६.१०२ ( द्रा. बाव, भाव; सं. भ्रातृ )
**भांडण** – **भंडनं** कलहः । ६.१०१
**भांभळ, भांभळ्या** ( वेडसर ) – **भंभलो** मूर्खः । ६.११०
**भावजय-भाऊज्जा** भ्रातृजाया । ६.१०३
**भालू** ( कोल्ही )–**भल्लुंकी** शिवा । ६.१०१
**भिंगुरटी** (एक किडा ) – **भिंगारी** मशकः । ६.१०५ ( सं. भृङ्गारी )
**भुंकणें** – **भुक्कणो** श्वा । ६.११०
**भूक–भुक्खा** क्षुत् । ६.१०६ ( सं. बुभुक्षा)
**भेजूट, भेंझूट** ( भित्रा ) – **भेज्जो** भीरुः । ६.१०७
**भेंडी** ( वृक्षविशेष ) – **भंडी** शिरीषवृक्षः । ६.१०९
**भोई** ( पालखी वगैरे वाहणारा ) – **भोईओ** ग्रामप्रधानम् । ६.१०८ (सं. भोगी )
**भोर्डी** ( पक्षीविशेष ) - **भोरुडो** भारुण्ड पक्षी । ६.१०८
**मटका, मोटका** (कों. बुटका ) – **मट्टो** शृंगहीनः । ६·११२ ( ता. माट्टइ )
**मठ्ठ** ( सुस्त ) – **मट्ठो** मन्दः । ६.११२
**मड** ( कों. मृताचें पिशाच ज्याच्या अंगांत येतें तो ) – **मडो** मृतः । ६.१४१ ( ते. मेड. सं. मृत )
**मतवाल, मस्तवाल** ( प्यालेला )–**मत्तवालो** मत्तः । ६.१२२
**मरळ, मर्गळ, मर्कळ** ( दमल्याचें सोंग करून बसून राहणारा बैल ) – **मरालो** अलसः । ६.११२
**महार** – **मइहरो** ग्रामप्रवरः । ६.१२१
**मळा, मळी–मलिअं** लघुक्षेत्रम् । ६.१४४
**मागें** – **मग्गो** पश्चात् । ६.१११
**माडी** ( मजला ) — **माडिअं** गृहम् । ६.१२८ ( का. माडि. ता. माडम् )
**मामा, मामी** – **मामा, मामी** मातुलानी । ६.११२ ( द्रा. मामा )
**मावळा, मावळण** – **माअलिआ** मातृष्वसा । ६.१३१
**माळा, माळ** – **मालो** मञ्चः । ६.१४६
**मुंगी** – **मुअंगी** कीटिका । ६.१३४
**मुंगुस–मंगुसो मुग्गसो मुग्गुसू** नकुलः । ६.११८
**मुमर, मुंवर** ( ऊन राख ) – **मुम्मुरो** करीषाग्निः । ६.१४७
**मुरळी** –**मुरई** असती । ६·१३५
**मूस** – **मूसा मूसाअं** लघुद्वारम् । ६.१३७
**मेर** – ( शेताची कड ) – **मेरा** मर्यादा । ६.११३ ( ता. मेरा. सं- मर्या. )
**मेळा, मेळावा** – **मेली** संहतिः । ६.१३८ ( सं. मेल )
**मेहुणी–मेहुणिआ** पत्न्या भगिनी । ६.१४८ ( सं. मैथुन )
**मोगरा** ( एक फूल ) – **मोग्गरो** मुकुलम् । ६.१३९ ( द्रा. मोग्ग. ते. मोगड )
**मोचा** (जोडा)–**मोचं** अर्धजङ्घी । ६.१३९
**मोहर** ( वासराचें मुसकें ) – **मुहलं** मुखम् । ६.१३४
**रवी** ( ताक घुसळण्याची )–**रवओ** मन्थानः । ७.३
**रांजण** – **रंजणो** घटः । ७.३

**राड** ( चिखल ) – **रेणी** पङ्कः । ७.९ **राडी** संग्रामः । ७.४

**रिकामा** – **रिक्कं** स्तोकम् । ७.६

**रिंगण** – **रिंगिअं** भ्रमणम् । ७.६

**रीग, रीघ** – **रिग्गो** प्रवेशः । ७.५

**रुई** – **रूवी** अर्कद्रुमः । ७.९

**रुंद** – **रुंदो** विपुलः । ७.१४

**रू** – **रूअं** तूलम् । ७.१

**रेजणें** ( मान देणें ) — **रेवयं** प्रणामः । ७.९

**रोट, रोटा, रोटी** – **रोट्टं** तन्दुलपिष्टम् । ७.११

**लांव** – **लामा** डाकिनी । ७.२१

**लांकूड** – **लक्कुडं** लकुटः । ७.१९

**लांच** – **लंचो** उत्कोचः । ७.१७

**लाट** ( भले, वाहवा ) – **लट्ठो** मनोहरः । ७.२६

**लेक** – **लिंको** बालः । ७.२२

**लेंड, लेंडी** — **लेड्डुओ** लोष्टः । **लेडुक्को** लोष्टः । ७.२४

**लोंवट, लोंवड** ( फळांचा घड ) – **लुंबी** स्तबकः । ७.२८

**वखार** — **वक्खारयं** रतिगृहं अन्तःपुरम् । ७.४५

**वट** ( कच्चें रेशीम धुऊन निघणारा गाळ ) – **वट्टिमं** अतिरिक्तम् । ७.३४

**वणवा** – **वणवो** दवाग्निः । ७.३७

**वरंड, वरंडा, वरंडी** ( कठडा, कडेची भिंत ) – **वरंडो** प्राकारः । ७.८६

**वरी** ( एक तृणधान्य ) – **वरइओ** धान्य-विशेषः । ७.४९ **वरओ** शालिभेदः । ७.३६

**वहाळ** (ओढा) – **वहोलो** लघुजलप्रवाहः । ७.३९

**वहिनी** — **वहुण्णी** ज्येष्ठभार्या । ७.४१ ( द्रा. वदिन, मदिनी. सं. वधू, वधुनी, भगिनी )

**वांगें, वांगी** — **वंगं** वृन्ताकम् । ७.२९ ( द्रा. वंग )

**वाईन** ( उखळ ) – **अवअण्णो** उदूखलम् अवहण्णो इत्यपि । १.२६ ( सं. अव + हन् )

**वाट** – **वट्टा** पन्थाः । ७.३१ ( सं. वृत् )

**वाडी** – **वाडी** वृत्तिः । ७.४३

**वाड** ( मोठा, अफाट ) — **वड्डो** महान् । ७.२९ ( ते. ओड्डु )

× **वाढवळ** ( कों. पावसाच्या आरंभीं शेतकरी शेतांत करतात ती पूजा, बळी वगैरे ) — **वड्ढवणं** अभ्युदयावेदनम् । ७.८७ ( सं. वर्धापन )

**वाण** ( फळ, वस्त्र, इ. दान ) — **वायणं** भोज्योपायनम् । ७.५७ ( सं. उपायन )

**वादळ** – **वद्दलं** दुर्दिनं । ७.३५

**वारिक** – ( औरंगाबादेजवळील लोकभाषा–न्हावी ) – **वारिओ** नापितः । ७.४७

**वाडवण** (कों. झाडणी)–**वड्ढणी** संमार्जनी । ७.४१ ( सं. वर्धनी )

**वाहळी, व्हाळी** – **वाहली** लघुजलप्रवाहः । ७.३९

**विंचणी** ( भांड्याला पडलेलें बारिक भोंक ) – **विंचिणिअं** पाटितम् । ७.९३

**विवळणें**–**विमालिअं** मत्सरभणितम् । ७.९२

**वीळ** ( भरती-ओहटी ) – **वीली** तरङ्गः । ७.७३

**वेठ** ( बिगार ) – **वट्टिवं** परकार्यम् । ७.४०  ( ते. वेट्टी )

**वेंधळा** ( बावळट ) — **वेइल्लो** शिथिलतां गतः । ७.९५

**वेल्हाळ** ( प्रिय ) — **वेलहलो** कोमलो विलासी । ७.९६

**वेसण** – **अवयासिणी** नासारज्जुः । १.४६

**शहाणा** – **छुप्पणो** विदग्धः । ३.२४ ( सं. षट्-प्रज्ञ )

शिकरण ( केळीं, साखर, दूध यांचें मिश्रण ) – सिहरिणी मार्जिता । ८.३३
शिंक – छिक्कम् क्षुतम् । ३.३६
शिगमा, शिमगा – सुगिम्हओ फाल्गुनोत्सवः । ८.३९ ( सं. सुग्रीष्मकः )
शिंगा, शिंगरू – सिंगओ तरुणः । ८.३१
शिंद – सिंदी खर्जुरी । ८.२९
शिंदळ, शिनळ–छिण्णो जारः । छिण्णालो जारः । ३.२७
शिवतर, शिपतर ( लहान टोपली ) — छेत्तरं जीर्ण शूर्पाद्युपकरणम् । ३.३२
शिवरा – सरिवाओ आसारः । ८.१२
शेजी, शेजार, शेजारीण — सइज्झो प्रातिवेश्मिकः । ८.१०
शेट — सेट्ठी ग्रामेशः ( द्रा. शेट्टि. सं. श्रेष्ठिन् ) ८.४२
शेंडा – छेंडा शिखा । ३.३९
शेंडी – छिंडं चूडा । ३.३५
शेण – छाणं गोमयम् । ३.३४ ( द्रा. चाणि, शानि )
शेपूट – छिप्पं छिप्पालुअं पुच्छम् । ३.३६
शेवट – छेओ अन्तः । ३.३८
शेवंती – सीमंतयं भूषणभेदः । ८.३५
शेळडूं, शेरडूं – छेलओ छागः । ३.३२
सर – सरा माला । ८.२
सरडा – सरडो कृकलासः । ८.११
सांगड – संघाडी युगलम् । ८.७
साय, साई–साहो दध्न उपरि सारम् । ८.५१
सायं – महाराष्ट्रदेशे पत्तनविशेषः । ? ८.५१
साल – छल्ली त्वक् । ३.२४
साव – सूहवो सुभगः । ८.४२
सांवर – सामरी शाल्मली । ८.२३
साळुंकी – सालंकी सारिका । ८.२४
सावळ ( ताडाची-माडाची झांप ) – साहुली शाखा । ८.५२
( सावली = छाया यापासून का ? )
सुगी – सुग्गं आत्मकुशलम् । ८.५६
सुरंगी ( फूल )–सुरंगी शिग्रुतरुः । ८.३७
सूरण, चुरण – सूरणो कन्दः । ८.४१
हरयाळी ( दूर्वा ) – हरिआली दूर्वा । ८.६४ ( सं. हरिताली )
हलकल्लोळ – हलबोलो कलकलः । ८.६४
हळहळ – हलहलं कौतुकम् । ८.७४
हाड – हड्डं अस्थि । ८.५९
हिरा – हीरो वज्रः । ८.७० ( सं. हीरक )
हीर ( केरसुणीची काडी ) — हीरो सूचीमुखाभं दार्वादिवस्तु । ८.७०
हेळा ( सहजीं ) – हेला वेगः । ८.७१
हुडा ( पैज ) – हुड्डा पणः । ८.७०

## कांही क्रियापदें

उठणें–उट्ठ ( उत्+स्था )
उंवळणें–ओंबाळणें (हलक्या हातानें धुणें)–ओंबाल
उलथणें–अल्लथ ( उत्–क्षिप् )
ओरपणें ( जोरानें ओढणें )–ओरंपिअ
कढणें–कढ् ( क्वथ् )
कमाविणें–कम्मव
खचणें ( कोंदणांत बसविणें )–खचिय
खुडणें, खुंटणें–खुड
खेळणें–खेड्ड
गुलगुल ( गोष्टी ) करणें–गुलल
घुमणें–गुम
घुट्ट करणें–घुट्ट
घुसळणें–घुसल
घेणें–घेत, गेण्ह्
चट्ट करणें–चड्डु
चढणें–चड
चुकणें–चुक्क
चोपडणें–चोप्पड
छोडणें ( सोडणें )–छड्डु
जागणें–जग्ग
जाणणें–जाण

जेवणें–जिम
झरणें–झर
झुरणें–झूर
डरणें – डर
तुटणें – तुट्ट
तुरतुर ( चालणें ) – तुर
तेवणें – तेअव
तोडणें – तोड
दुभणें – दुब्भ
देखणें – देक्ख
दाखविणें – देक्खइ
देणें – दे
धाडणें – धाड
नासणें – नास
पडणें – पड
पाठविणें – पट्ठव
पावणें – पाव
पुसणें, पुंसणें – पुस, पुंस
पेलणें – पेल्ल
पोळणें – पउल्ल
फिरणें – परी
फुटणें – फिट्ट, फुट्ट
फुसणें – फुस
बडबडणें – बडबड
बुडणें – बुड्ड
बहकणें – बुक्क
बुजणें – वज्ज, वोज्ज
बोलणें – वोल्ल
भिणें – बीह
भुमणें – भुम
मिळणें – मिल्ल
मिळविणें – मेलव
राबणें ( वारंवार येणें–जाणें ) – रंभ्
रापणें ( काळें पडणें ) – राविअं
रुसणें – रूस
रेवणें ( भरणें ) – अहिरेम
लिकणें ( दडणें ) – लिक्क
लेणें ( धारण करणें ) – लइअ
वागुळणें ( चर्वण करणें ) – वग्गोल
विसरणें – वीसर
वेढणें – वेढ
शिवणें ( स्पर्शणें ) – छिव
सांगडणें ( जोडणें ) – संगल
सांगणें – संघ
सारवासारव करणें–सारव
सिंपणें ( शिंपणें )–सिंप
सोलणें–सोल्ल
हारवणें–हारव
हालणें–हल्लिअं
हिंसणें–हिक्किअ
होणें–हव, हू, हुव, हो, होअ

## कांही अव्ययें

हां ( कबुली )–आम
ऊं ( तिरस्कार इ. )–उ
की ( प्रश्नार्थी )–किणो
किर ( खचित )–किर
नाही ( नकार )–णाइं
थू ( धिक्कार, निंदा )–थू
वी ( हि अर्थी )–पि, वि
रे ( संवादांत वगैरे )–रे
व ( आणि )–व
हूं ( निषेध वगैरे )–हुं

टीप :—या शब्दांच्या बाबतींत अर्थविस्तार, अर्थसंकोच, लिंगान्तर, वर्णान्तर इत्यादि विचार या लेखांत केलेला नाही.

# साहित्य-समीक्षा

## आधुनिक मराठी गद्याची उत्क्रांति

एकोणिसाव्या शतकांतील अव्वल इंग्रजीचा काल हा अनेक दृष्टींनी महत्त्वाचा होता. त्या काळीं महाराष्ट्र देश, भाषा व धर्म ह्यांच्यावर फाकणारा ' नव्या सुधारणेचा प्रकाश ' हा अगदींच अपूर्व असा होता. भाषेच्या दृष्टीनें पाहतां ह्या कालांत मराठी गद्याचा विकास हा इंग्रजी भाषेच्या व वाङ्मयाच्या सावटींत होत होता. मुद्रणकलेच्या प्रसारामुळे तत्कालीन गद्यलेखनाला विशेष चालना मिळाली. त्या वेळच्या माऊंट स्टुअर्ट एल्फिन्स्टन् प्रभृति राज्य-कर्त्यांनी आंग्लसत्तेच्या बळकटीसाठी का होईना, लोकशिक्षणाच्या उच्च ध्येयानें प्रेरित होऊन सार्वत्रिक शिक्षणाचा पाया घातला. ह्या कामीं त्यांनी एतद्देशीय विद्वान् शास्त्रीमंडळींचा चांगला उपयोग करून घेतला. ह्या कालखंडांतील वाङ्मय हें बहुतांशीं शालेय होतें. ' आधुनिक मराठी गद्याची उत्क्रांति ' ह्या प्रस्तुत ग्रंथांत मुख्यत्वेकरून तत्कालीन मराठी शालेय वाङ्मयाची चर्चा आहे.

प्रस्तुत ग्रंथाचा विषय अव्वल इंग्रजींतील शालेय वाङ्मय असा असला, तरी आजच्या मराठीच्या स्वरूपावर त्याचा झालेला परिणाम ह्याचेंहि त्यांत विवेचन आहे. वस्तुतः ह्या प्रबंधस्वरूप ग्रंथाचें मूळ नांव 'एकोणिसाव्या शतकांतील मराठी शालेय वाङ्मय व त्याचा आजच्या मराठी भाषेच्या घटनेवर झालेला परिणाम ' असें होतें; पण कां कोणास ठाऊक ' आधुनिक मराठी गद्याची उत्क्रांति ' हें नांव लेखकानें ह्या ग्रंथाला दिलेलें आहे. ग्रंथाच्या नामकरणाच्या बाबतींत लेखकानें साशंकता प्रकट केलेली असल्यामुळे त्याचें समर्थन अर्थातच होऊं शकलें नाहीं. लेखकाच्या ह्या भूमिकेमुळे ग्रंथाचा विषय व त्याचें नांव ह्यांची सांगड घालण्याच्या बाबतींत वाचकालाहि अडखळल्यासारखें होतें. ग्रंथाच्या मूळ नांवाचा स्वीकार केला असता, तर हा प्रकार खात्रीनें टळला असता. कारण तेंच नांव अधिक समर्पक वाटतें.

पहिल्या प्रकरणांत मराठी गद्याची पूर्वपीठिका देतांना लेखकानें त्याचें स्वरूप सोदाहरण स्पष्ट करण्याचा प्रयत्न केला आहे. मराठेशाहींतील गद्यापैकी बखर-वाङ्मयासंबंधीं चर्चा करतांना बखरकारांची भाषा व्याकरणरहित असल्याचें लेखक म्हणतात. व्याकरणशुद्धतेच्या दृष्टीनें पाहिल्यास त्यांत पुष्कळ दोष आढळतात असें त्यांचें मत दिसतें; परंतु आमच्या मतें आजच्या मराठीच्या दृष्टीनें बखरींच्या भाषेकडे पाहणें योग्य होणार नाहीं. मराठी बखरींचा विचार करतांना त्यांतहि कांहीं व्याकरण-विशेष आहेत, हें लक्षांत घेतलें पाहिजे. बखरींचे व्याकरण–विशेष हेंच त्यांचें वैशिष्ट्य होय; किंबहुना बखरींतल्या भाषेचें सौंदर्य हें त्यांतील व्याकरण–विशेषांमुळेच वाढलें आहे ह्यांत संशय नाहीं. ह्या चर्चेच्या संदर्भात बखरींतील वाक्यें लांब व असंबद्ध असतात असें लेखकानें म्हटलें आहे (पृ. ६); पण हेंहि म्हणणें खरें नाहीं. बहुसंख्याक–विशेषतः वाङ्मयीन स्वरू-पाच्या—बखरींतील वाक्यें लहान असून अत्यंत सुसंबद्ध आहेत. भाऊसाहेबांची बखर हें त्याचें

**आधुनिक मराठी गद्याची उत्क्रांति–[ लेखक व प्रकाशक : डॉ. कृ. भि. कुलकर्णी, ७ एफ्, शारदाश्रम, भवानीशंकर रोड, मुंबई २८. पृष्ठें ३९९ + ७७, मूल्य १५ रुपये. ]**

सर्वोत्कृष्ट उदाहरण होय. लहान लहान चटकदार वाक्यांमुळेच बखरींत भाषेचा अखंड ओघ निर्माण झालेला दिसतो. बखरींना साहित्याचें तेज ह्यामुळे प्राप्त झालेलें आहे हें स्पष्ट आहे. मोडी लिपीमुळे ऱ्हस्वदीर्घांकडे लेखकांचें दुर्लक्ष झालें, हें लेखकाचें विधान पटण्यासारखें नाही. मूळ लेखकापेक्षा तो नकलकारांचा दोष म्हणतां येईल, कारण मूळ हस्तलिखितें आज उपलब्ध नाहीत. बखरींपुरतें बोलावयाचें म्हटलें, तर मोडी वाचनाच्या चुका संपादनाच्या वेळीं झालेल्या दिसतात. मूळ हस्तलिखितांपेक्षा नकलकारांच्या निरनिराळ्या प्रतींवरून मराठी बखरींचें प्रकाशन झालेलें आहे, हें ध्यानांत घेतलें पाहिजे. अशा परिस्थितींत मूळ लेखकाला कसें जबाबदार धरतां येईल ?

दुसऱ्या प्रकरणांत लेखकाने महाराष्ट्राबाहेरील मराठी ज्ञानदानाचे प्रयत्न कसकसे झाले त्याची साधार माहिती दिली आहे. मद्रासच्या कॉलेजमध्येहि मराठी भाषेचा अभ्यास होत होता व १८१८ मधील वार्षिक परीक्षेंत मराठींत उत्तीर्ण झालेले कांही सनदी नोकर होते ही माहिती नवीन वाटेल. मुंबईला अशा तऱ्हेचें कॉलेज नव्हतें हें एक ऐतिहासिक कटु सत्य आहे. एवढें मात्र खरें कीं, कलकत्त्याचें फोर्ट विल्यम कॉलेज, तसेंच इंग्लंडमधील हेलिबरी कॉलेज व मद्रास येथील कॉलेज इत्यादि संस्थांमुळें देशी भाषांच्या अभ्यासाला जोर येऊन त्यांत ग्रंथ निर्माण होत होते. वरील कॉलेजें सनदी नोकरांसाठी असलीं, तरी देशी भाषांच्या विकासाच्या दृष्टीने त्यांचा चांगला उपयोग झाला, ह्या महत्त्वाच्या मुद्द्याकडे ग्रंथकर्त्याने लक्ष वेधलें आहे तें योग्यच होय.

तिसऱ्या प्रकरणांत एल्फिन्स्टनने महाराष्ट्रांत केलेल्या कामगिरीचें मुद्देसूद विवेचन आढळतें. एल्फिन्स्टन धूर्त, धोरणी पण उदारमतवादी कसा होता व सार्वत्रिक शिक्षण-प्रसाराचें थोर कार्य त्यानें कसें केलें हें लेखकाने अत्यंत संयमपूर्ण भाषेत सांगितलें आहे. प्रत्यक्ष कायद्याने शांतता प्रस्थापित करण्यापेक्षा ज्ञानप्रसाराचें कार्य हातीं घेऊन लोकांना न दुखवितां त्यांचीं मनें जिंकून घेणें हें एल्फिन्स्टनचें ध्येय होतें; तरीदेखील तत्कालीन शालेय पुस्तकांच्या निर्मितीमागें त्याचें धार्मिक धोरण कसें होतें हें लेखकाने स्पष्टपणें दाखवून त्याच्या व्यक्तित्वावर चांगला प्रकाश पाडला आहे. आमच्या मतें हें विवेचन त्रोटक वाटतें. एल्फिन्स्टनच्या मनो-वृत्तीचें अधिक विश्लेषण झालें असतें तर त्याच्या कार्याची अधिक स्पष्ट कल्पना येऊं शकली असती व त्याने सुरू केलेल्या शालेय पुस्तकांचीं भाषांतरें करवून घेण्याच्या पद्धतीमुळे हैंदशाळा शाळा पुस्तक मंडळीच्या कामाला कशी चालना मिळाली याचेंहि स्पष्ट चित्र उभें राहिलें असतें.

शालेय पुस्तकांच्या निर्मितीच्या कामीं मेजर कँडी ह्यांचें कार्य महत्त्वाचें होय. लेखकाने कँडीच्या भाषाविषयक धोरणाची चिकित्सा करून शालेय पुस्तकें व शिक्षणशास्त्र ह्यांत कसकशी सुधारणा होत गेली ह्याचा पद्धतशीर आढावा पांचव्या प्रकरणांत घेतला आहे. मराठी भाषेतील पुस्तकासंबंधीं कोणतेंहि काम असो, त्या ठिकाणीं मेजर कँडी असलेच पाहिजेत हें लेखकाचें म्हणणें कोण नाकारील ? त्या काळाला 'कँडीयुग' हें समर्पक नांव देऊन त्याने कँडीच्या कामगिरीचा जो गौरव केला आहे तो उचितच होय.

सातव्या प्रकरणामध्ये मराठी भाषेंतील तत्कालीन व्याकरणविषयक पुस्तकांचा परामर्श घेतलेला आहे. डॉ. विल्यम कॅरे, विद्यानाथपंडित, मुनशी मखबा, रे. स्टिव्हन्सन, रे. बर्जेस, गंगाधरशास्त्री फडके, बाळशास्त्री जांभेकर, दादोबा पांडुरंग, कृष्णशास्त्री चिपळूणकर इत्यादि विद्वानांनी ह्या क्षेत्रांत स्पृहणीय कामगिरी करून मराठी ग्रंथसंपत्तींत कशी भर घातली ह्याचें सुसंगत विवेचन आहे. ह्या विवेचनावरून त्या त्या लेखकांची व्याकरणविषयक भूमिका उत्कृष्टपणें समजून येते. हें विवेचन करतांना तत्कालीन व्याकरणविषयक विविध वाद लेखकाने

सूक्ष्मपणे चर्चिले आहेत. आधुनिक मराठी भाषेच्या घटनेच्या अभ्यासाच्या दृष्टीने ही चर्चा निश्चित मार्गदर्शक होईल. मेजर कँडींनी मराठी व्याकरण लिहावें अशी सूचना आल्यावर त्यांनी पुढील मार्मिक उत्तर दिलें–' With regard to my own share in it, I shall be happy to give the very best assistance that is in my power; but the chief part of a Marathi Grammar in Marathi and for Marathas should, I think, be borne by Marathas. ' पृ. ( ११० ). कँडींच्या ह्या उदार धोरणाबद्दल कोणालाहि त्यांच्याबद्दल आदरच वाटेल.

पुढील प्रकरणांत कोशवाङ्मय, कथावाङ्मय, मराठी क्रमिक पुस्तकें, गणितविषयक शालेय पुस्तकें, शास्त्रीय पुस्तकें, इतिहास व भूगोलविषयक पुस्तकें इत्यादि विषयांची सविस्तर हकीगत आहे. ह्या पुस्तकांचा महत्त्वाचा फायदा म्हणजे लेखकाने म्हटल्याप्रमाणे त्या त्या विषयाची परिभाषा तयार होऊन पुढील पिढीच्या ती उपयोगी पडली. बहुतेक पुस्तकें मेजर कँडींच्या नजरे-खालून जात व त्यांतील व्याकरणविषयक दोष किंवा लेखनविषयक चुका ते दाखवीत. ग्रंथ-काराने ह्यासंबंधी कँडींच्या टीकालेखांतील कांही भाग उद्धृत केला आहे. इतिहासभूगोल-विषयक पुस्तकांच्या बाबतींत भाषेच्या कडकपणाचें धोरण तत्कालीन विद्याखात्याने पाळलें, त्यामुळेच आजची मराठी भाषा तयार झाली असा लेखकाने निष्कर्ष काढला आहे तो मान्य करण्यास प्रत्यवाय नाही. मेजर कँडी व तत्कालीन विद्याखातें ह्यांनी ज्ञानदानाबरोबर भाषाशुद्धीच्या बाबतींत केलेली ही कामगिरी सुवर्णाक्षरांनी लिहून ठेवण्यासारखी आहे हें निर्विवाद होय.

ह्या सुमारास ख्रिस्ती धर्मोपदेशकांनी सामुदायिक शिक्षणाचा प्रसार केल्यामुळे देशी भाषांत शालेय पुस्तकांची निर्मिति झाली. हा समग्र इतिहास एका स्वतंत्र प्रकरणांत आहे. हीं पुस्तकें तयार करतांना युरोपियन लोकांनी ऐतद्देशीय विद्वानांचें साह्य घेतलें व त्यांचें ऋण त्यांनी मोकळ्या मनाने मान्य केलें धर्मोपदेशकांनी तयार केलेल्या ह्या शालोपयोगी पुस्तकांत भाषेचें स्वरूप तितकेंसें शुद्ध नाही; तरी देखील त्यांची थोर कामगिरी म्हणावयास हवी हें लेखकाचें मत मान्य होण्यासारखें आहे.

गेल्या शतकांतील अत्यंत जिव्हाळ्याचा विषय म्हणजे मेजर कँडी व भाषिक वाद हा होय. आदर्श भाषांतराच्या बाबतींत मेजर कँडी ह्यांच्या कांही कल्पना होत्या. त्या शेवटीं परिशिष्ट १ मध्ये त्यांच्याच शब्दांत दिलेल्या आहेत. दादोबांच्या विद्वत्तेबद्दल योग्य तो आदर व्यक्त करून त्यांच्यावर टीका करण्यास कँडीने मुळीच कमी केलें नाही. ह्याचा परिणाम असा झाला की, त्याच्या भाषाविषयक धोरणावर जाहीर टीका झाली. परंतु कँडीने त्याची पर्वा न करतां अत्यंत विनयाने उत्तर दिलें. ह्या उत्तरावरून कँडीच्या भूमिकेची चांगली कल्पना येते. लोकमत आणि कँडी असा त्या वेळचा सामना होता. ग्रंथकर्त्याने विवाद्य वाक्यरचनेचा हा समग्र इतिहास दिला आहे. ' जहांगीर बादशहाने तिला आपली मुख्य व आवडती राणी केली कीं केलें ' ह्या बाबतींत कँडीने दिलेला ' केलें ' हा निर्णय आजहि चिंत्य वाटतो. इंग्रजी शब्दांचे उच्चार कसे करावे ह्याबद्दल मेजर कँडीने विविधज्ञानविस्तारकर्त्यांशीं दोन हात करून स्वमतसमर्थनार्थ विल्यम जोन्स, स्टिव्हन्सन इत्यादि विद्वानांचीं मतें मांडलीं. विरामचिन्हांच्या उपयोगाबद्दल कँडीने चांगलें मार्गदर्शन केलें व त्याच्या सूचनेमुळेच विरामचिन्हांचा पद्धतशीर उपयोग होऊं लागला. पुढे कँडीच्या निधनानंतर त्यांत बदल होऊं लागला. तरी त्याचें कार्य कमी महत्त्वाचें ठरत नाही अशा प्रकारें प्रस्तुत ग्रंथांत मराठी लेखनाला स्थैर्य आणण्याच्या दृष्टीने शालेय पुस्तकांचा कसा उपयोग झाला हें लेखकाने तपशिलासह दाखवून दिलें आहे.

अनुक्रमणिका

एकोणिसावें शतक अगदी अलीकडचें असलें तरी ह्या कालांतील उपलब्ध माहिती बरीच कमी आहे. त्याचें प्रमुख कारण म्हणजे तत्कालीन वाङ्मय हें सरकारी धोरणावर अवलंबून होतें. सरकारी दप्तरखान्यांतच ह्यासंबंधीचे कागदपत्र होते. त्या कागदपत्रांतील मजकुराची जुळणी करून तत्कालीन भाषेचा इतिहास लिहिणें हें कांही सोपें काम नव्हे. बऱ्याचशा बाबींची सरकारी नोंदहि नसण्याचा संभव अधिक. अशा परिस्थितींत शालेय क्रमिक पुस्तकांचा एक सलग व सुसंगत इतिहास लिहिण्याची अवघड कामगिरी प्रस्तुत ग्रंथाच्या रूपाने लेखकाने करून दाखविली आहे. सुबोध भाषापद्धति, साधार तपशीलवार हकीगत, मुद्देसूद पण अनाग्रही विवेचन इत्यादि गुणांमुळे प्रस्तुत ग्रंथ मौलिक स्वरूपाचा झाला आहे, ह्यांत सुतराम् संदेह नाही. ● ● ●

र. वि. हेरवाडकर

## सेतु

'सेतु' हा बापटांचा दुसरा संग्रह. 'बिजली'तील बापट येथे फारसे दिसत नाहीत. किंबहुना 'बिजली'त बापट दिसत नव्हते ते येथे दिसतात. हें या संग्रहाचें वेगळेंपण. बापटांना स्वतःलाच स्वतःचें व्यक्तिमत्त्व अजून सापडलें नव्हतें, तें आता सापडलें याचा प्रत्यय येतो.

हें व्यक्तिमत्त्व सौंदर्यवादी कवीचें. म्हणूनच 'मी अहेतुकाचा हेतु' किंवा 'केवळ सौंदर्य केवळ आनंद' असा उद्घोष त्यांना करावासा वाटला. मुळांतच 'छंदांत बोलण्याचा छंद'. परंतु छंदाविरुद्ध चाललेल्या प्रतिक्रियेचा व सामाजिक आशयाला मिळणारा महत्त्वाचा परिणाम बापटांच्या कवितेवर झाला. पण लालित्य व व्यक्तिगत अनुभूति यांना हिणकस ठरविण्यांत चूक होत आहे, हें त्यांच्या ध्यानीं आलें.

मुक्तछंद व सामाजिक जाणीव हींच काय तीं काव्याचीं लक्षणें, असें मानण्याकडे आज अनेकांचा कल आहे. एके काळीं असेंच मत असलेल्या बापटांचें मतपरिवर्तन म्हणजे या (गैर) समजुतीवरील उताराच; आणि बापटांची ललित व घाटदार रचना म्हणजे कांहींना नको असलेले 'मात्रांचे वळसे !' त्यांचें कविमन लयींतच स्पंदन पावतें याची साक्ष पटविणाऱ्या कितीतरी कविता आहेत. 'वय वर्षे सोळा,' 'रंगानें तूं गव्हाळ,' अशा कवितांचें (व बोरकरांचेंहि) स्मरण या संदर्भात अपरिहार्य ठरेल.

बापटांची कविता ही प्रेमाची कविता आहे. हें प्रेमहि अपेर्शी. या जगांतलेंच. दूर कुठेतरी 'शृंगेरी' वसविणारें नव्हे. तें यौवनाच्या देहलीवरलें,

> शैशव माझें सरलें होतें, सरलें नव्हतें
> सारें कांहीं कळलें होतें, कळलें नव्हतें.

अशा काळांतलें असलें तरी न विसरतां येणारें. नल-दमयंती, सीता-रघुराज यांचीं स्वयंवरें लावणारें. दोघांतील नातेंहि 'अकलंकाचें' असलें तरी एका निःश्वासाने तें बदलतें. शैशवापेक्षा तो एकच श्वास आता स्मरणीय ठरतो.

सेतु – [ कवितासंग्रह : वसंत बापट. प्रकाशक : पॉप्युलर बुक-डेपो, मुंबई ७. किं. ३ रु. ]

मग या जाळणाऱ्या वंचनेवर दोघांनाहि फुंकर हवीशी वाटूं लागते.

आतां एकच सांग,
उंबऱ्यावर तुझ्या डोळ्यांत पाणी आलें –
इतकी कां तुला सुपारी लागली ?

या प्रश्नाला उत्तर न मिळणें एवढीच फुंकर मनाला पुरेशी. पण तरीहि मनापुढे प्रश्नचिन्ह उभें राहतें,

दुःख एवढें–होतिस कां तूं त्या तोलाची ?
अशी जिंदगी बाद कराया अनमोलाची ?

या प्रश्नावरहि तो ' श्यामल तीळ, ' ती ' बिलोरी पाठ ' यांची आठवण मात करते.

माझा कोट तुझ्या खांद्यावर
शाल तुझी अन् माझ्या देहीं

हें ' निश्चित ' घडल्याचें आठवतें.

विफल प्रीतीचें हें चित्रण पाहिलें की ' जर का पटता शब्द ' तर हीं विव्हळ गीतें आपणांस मिळालीं नसतीं, हें पटतें. ' निचिन्त ' सारख्या कवितेंत साफल्याचे क्षण आहेत. निर्चित गाठ पडण्याचा केव्हातरी जमणारा ' घाट ' आहे. एरवी ' नाटक ', ' आमंत्रण ', ' कर्णफुलें ' यांमधील व्यथाच सर्वत्र. ' खूण ' मध्ये

एकच खूण तिथें न्यारी
वळचणिच्या कौलांत
घुमत पारवा जो आहे
तें तर माझें भूत !

असें व्यथेचें तीव्र स्वरूप दिसतें.

बापटांच्या कवितेंत ' बहाणा ' नांवाची कविता आहे; पण दिव्यत्वाचा अगर उदात्ततेचा बहाणा नाही. तें प्रेम शारीरिकच आहे. (म्हणून ?) उत्कट आहे, खरें आहे. आत्म्याची (वा अध्यात्माची ) ' भानगड ' त्यांत नाही. ' अनभुक्त उबेची हाक ' घालणारें ( व ऐकणारें ) हें प्रेम आहे.

स्पर्शवीणा तूं छेड....
गरम रक्तालाहि कांहीं अर्थ आहे...

किंवा,

तो वणवा....तें वादळ
तें जळणें....तेंच खरें

या ओळी काय सांगतात ? हें प्रेम अपेशी ठरतें यालाहि ( पूर्वीप्रमाणे ) ' जातीय ' किंवा ' सामाजिक ' कारणें नाहींत. एक अनामिक ' सांखळी ' एका परिघाबाहेर जाऊं देत नाही, हेंच अपयशाचें कारण. ' प्रतिष्ठेची कळ ' हा साखळींतलाच एक दुवा आहे.

मराठींत प्रेमकविता ' गवताऐसी उदंड ' आहे. पण चांगल्या प्रेमकविताहि (माणूस पाहून ) ' खाजगी सुखदुःखाच्या ' किंवा ' पुस्तकी, ' ' उसन्या ' प्रेमाच्या म्हणून बेगडी ठरविल्या जातात. काव्य म्हणून प्रेमकविताहि सरस असूं शकते, हें बापटांच्या कवितेने पुन्हा सिद्ध केलें आहे. एखाद्याने निव्वळ ( पण चांगली ) प्रेमकविताच लिहिली म्हणून त्याच्या काव्याचें मूल्य कमी मानलें जाऊं नये.

प्रीतीच्या विविध–बहुरंगी व बहुढंगी–अनुभवच्छटा उकलण्याचें सामर्थ्य बापटांच्या

प्रतिभेंत आहे. 'मुखवटा', 'एक डोळा आणि एक डोळा', 'नदी' अशा कवितांहून 'अधर्म', 'प्रियंवदा' अशा जातीच्या (व जातिवंत) कवितांचीच रसिकांना अपेक्षा असावी. त्यांची प्रेमकविता 'शरदामधली पहांट' आहे. तिची कांती 'आरस्पानी' आहे. प्रेमिकांप्रमाणेच जुन्या-नव्या काव्यामधीलहि ती 'सेतु' ठरेल असा विश्वास वाटतो. ● ● ●

पण्डित आवळीकर

## अक्षरवेल

'अक्षरवेल' मध्ये रेग्यांचा 'कवि' म्हणून प्रथमच परिचय होत आहे. त्यांच्या कवितेवर एक तऱ्हेच्या औदासीन्याची व दुःखाची दाट छाया पसरलेली आहे. हें औदासीन्य व दुःख केवळ प्रेमभंगाचें (म्हणजे वैयक्तिक) नव्हे, हें या कवितेचें वैशिष्ट्य. आपल्या अनेक चांगल्या कवींची कविता दुःखाची आहे; पण ती (निराशा) प्रेमाची आहे. रेग्यांची कविता प्रेमकविता नाहीं, तरीहि दुःखाची आहे.

माझेंहि मन
दुमडुन गुडघे पोटाशीं
बसलेलें....

किंवा,

माझ्या मनाला
आकाशाची जखम झाली आहे....

हे उद्‌गार या दुःखाचेच द्योतक. त्यांची कविता हें 'वेदनांचें कथ्यक' आहे. या वेदनांचीं कारणें वेगवेगळीं. कधी द्रौपदी, भीष्म, द्रोण यांच्या स्मरणाने 'आकाशाची जखम' मनाला होते, तर कधी खिस्ताच्या मरणाने. (म्हणूनच खिस्तावरल्या कवितांत रेग्यांचें मन हलकें झालेलें दिसतें.) म्हणजे हें दुःख बरेंचसें 'सार्वजनिक' (खाजगी नव्हे) आहे.

रांगडे शिपाई
जे हिरोशिमाच्या तिरडीवर
आपुलकीनें निजले
दोन महायुद्धांचं लोणी खांतं ....

त्यांच्याहि आठवणीचं निमित्त या दुःखाला आहे. 'हेंच कवच कुरवाळीत बसायचं' दुःखहि आहेच. हें दुःख प्रत्येक कलावंताच्या नशिबीं आलेलें. पण त्याचबरोबर 'हें आकाशाचं यडगं आम्हांला फोडायचं आहे' किंवा 'मला फिनिक्सचें अंडें उबवायचें आहे' हें स्वप्न स्वप्नच राहिल्याची व्यथा आहे. क्वचित् प्रीतीच्या कबरीपाशीं डोलणारी 'कळी' किंवा कुणासाठी तरी झुरणारें 'रानकबूतर' प्रेमभंगाची आठवण करून देतें. पण या दुःखावरहि मलम आहेच—

युधिष्ठिराचं इमानी कुत्रं
मागें मागें घोंटाळतं आहे
भऊ....ओल्याशार जिभेनं
माझी जखम चाटतं आहे....

अक्षरवेल — [ कवितासंग्रह : सदानंद रेगे; प्रकाशक : पॉप्युलर बुक-डेपो, मुंबई ७. किं. ३ रु. ]

रेग्यांची निसर्गकविता अधिक स्मरणांत राहते. ऊनपावसाचे पक्षी, पाऊसपक्षी, पक्षीऊन्हाचा (या प्रतिमा कीं शाब्दिक कसरत ?), पाखरें थेंबांचीं, आषाढचिमणी इत्यादि मंडळी या कवितेंत भेटतात. (या पक्ष्यांचें 'घरटें' मात्र पाडगांवकरांच्या कवितेंत दिसतें.) याहि कवितेंतून रेग्यांची दुःखप्रीतीच व्यक्त झाली आहे. येथे निसर्गदर्शनापेक्षा मनोदर्शनाला महत्त्व अधिक आहे, हेंहि खोटें नाही. आषाढ-श्रावणाच्या ओढींतहि रेग्यांचें मन दिसतें. या आकर्षणाची वा. ल. नी केलेली मीमांसा पटण्यासारखी आहे. 'ती अशीच होती सकाळ,' 'शेला,' या कवितांचें सौंदर्य-या दृष्टीने-आगळें आहे. 'दुपार' ही कविता उत्कृष्ट शब्दचित्र आहे.

आणिक मनाच्या
वळचणीपाशी
घुमे पारव्यांची
जोडी. सांवळीशी

असें वातावरण बऱ्याच कवितांत असलें तरी

सोनफुलोरा नव्या उन्हाचा
त्यांत फुलांचा फेर बिलोरी

किंवा,

ऊन कोवळें दाटलें
केशराच्या रानोरानीं.

अशी प्रसन्नताहि क्वचित् आढळते.

'प्रतिमांची रांगच रांग' हें वा. ल. ना रेग्यांच्या निसर्ग-कवितेचें वैशिष्ट्य वाटतें. शब्दचित्र व प्रतिमा; रूपक व प्रतिमा यांतील फरक स्पष्ट व्हावयास हवा. (पाऊसपक्षी हें रूपक नाही काय ?) प्रतिमेंत अलंकाराच्याच भिन्न भिन्न छटा अनेकदा दिसतात; म्हणूनच प्रतिमासृष्टि नसलेल्या कवितेंतील कथनाला वा. ल. 'अनलंकृत' म्हणतात. "Of beauty there is little; it is elbowed out by a succession of vivid fashion-plate pictures alternating with kaleidoscope designs"; या Edith Sitwell च्या कवितेबद्दलच्या अभिप्रायाचें स्मरण येथे होतें. रेग्यांच्या प्रतिमासृष्टीला हा अभिप्राय लागूं पडण्यासारखा आहे.

रेग्यांच्या वृत्तींतील 'विक्षिप्तपणा' 'ब्रह्मांडाच्या नाक्यावरून' फिरून येण्यांत आहे; तसा 'उंदीर', 'सवत' यासारख्या कवितांत आहे. या कविता 'किंचित् काव्यें'च आहेत. 'रेगे यांची कल्पकता असाधारण आहे', हें विधान सर्वांना मान्य होण्यासारखें नाही. त्यांच्याकडे कल्पकता आहे, याबाबत मतभेद होणार नाही. अनुभवाचा अस्पष्ट आकार व अस्थिरता यांबरोबरच रेग्यांच्यावर अन्य कवींचे प्रभावहि जाणवतात. (बालकवींचा 'पारवा' तर बऱ्याच जागीं घुमत आहे !)

'अक्षरवेल' या कवितेंतील (व संग्रहाच्या मलपृष्ठावरील) निवेदनाला अजून अर्धसत्याचेंच स्वरूप आहे. रेग्यांच्या कवितेची कुंडली मांडण्याचीही फारशी जरूरी नाही. आज 'कवि' म्हणून पुढे येत असलेले रेगे उद्याहि 'किंचित् कवि' म्हणूनच राहण्याचा संभव आहे. तें न झालें तर मराठींत उदासरम्य निसर्गकवितेची भर पडेल. ● ● ●

पण्डित आवळीकर

अनुक्रमणिका

## छोरी

'छोरी' हा पाडगांकरांचा तिसरा संग्रह. पाडगांवकर हे 'भावकवि' आहेत. विविध भावानुभवांचें (व त्यांतूनच स्फुरणाऱ्या विचारानुभवांचें) सौंदर्य हा त्यांच्या कवितेचा विशेष आहे. 'निसर्ग आणि प्रेम याविषयींचे माझे अनुभव माझ्या आजपर्यंतच्या कवितांत व्यक्त झाले आहेत' असें पाडगांवकर म्हणतात.

पण हे अनुभव अलग नाहीत. त्यांची निसर्गकविता ही प्रेमकविताहि असते आणि प्रेमकविता निसर्गकविताहि असते. यामुळेच एका अलौकिक भावविश्वाची जागृति करण्याचें सामर्थ्य त्यांच्या कवितेंत आढळतें.

पाडगांवकरांच्या कवितेंत व्यक्तित्व असलेले क्षण जिवंत झालेले दिसतात. प्रत्येक क्षण significant असतो.

मीं विचारलें तिज, " नांव तुझें..."
ती खट्याळ हसली आणि म्हणाली,
" नांव ! छोरी....हात पुढें कर."

हा क्षण उत्कटतेने ओथंबलेला आहे. तर कांही क्षण —

श्रावणाचिया
ओल्याचिंब उन्हांतुन तूं
आली होतिस;

किंवा,

जेव्हां
निळें पांखरूं होऊनियां
आकाश उतरतें हळूंच खालीं,

किंवा,

— क्षणभर
झाडच होतें श्रावण :

अशा तऱ्हेचे आहेत. कांही क्षण गाढ, तर कांही पाऱ्याचे. कांही पिवळ्या चोचींचे तपकिरी तर कांही पिकल्या टपोर द्राक्षांसारखे. या क्षणांतील अनुभव मुख्यतः तृप्तीचा. परंतु कधी 'दोन क्षणांतिल नातें' हरवतें; तर कधी 'वेदनेच्या पांगाऱ्याचे' कांटे एकाला व फुलें दुसऱ्याला मिळतात. 'शब्दांचा आशय' हरवतो किंवा 'शब्दांना भोवळ येते.' एखादा क्षण 'मौनानें मौनच धरिलें हृदयाशीं' असा असतो. तरीहि,

कळतें सारें
कळण्याच्याही पलिकडलें

किंवा,

मी जगतों :
माझ्याहि पलिकडे जाऊन....

---

छोरी — [ कवितासंग्रह : मंगेश पाडगांवकर; प्रकाशक : पॉप्युलर बुक-डेपो, मुंबई ७. किं. ३ रु. ]

हा अनुभव येतोच. उंच मनोऱ्यावरील घंटा ऐकूं येते; व्यक्तित्वाची चौकट फुटते. मग या जिप्सीला खरें जीवनदर्शन घडतें.

अनावर अशा धुंद क्षणीं त्या
आवरलीं जर असतीस तुझ्या
ओठांवरलीं गणितें सावध....
पायतळींच्या मातीपरि तूं
अवचित जर असतीस वसरली
कळलें असतें सत्य तुला तें शोधावांचुन

किंवा,

विसरायाचें म्हणशिल जितुकें
तितुकें अधिकच सारें स्मरशिल
दूर जायचें म्हणशिल जितुकी
तितुकी अधिकच जवळीं येशिल

या कवितांत 'जवळपणाचें झालें बंधन' मधल्या अनुभवाइतकाच उत्कट व श्रेष्ठ जीवनानुभव आहे.

'छोरी' मधील कविता ही अशी. 'जिप्सी'हून जरा वेगळी वाटणारी. हें वेगळेंपण म्हणजे प्रतिमाप्रीति. पाडगांवकर satire लिहीत राहतील हा 'जिप्सी' मध्ये दिसणारा धोका टळला. 'अहो जग पुढे गेलें', 'पळवाट' या कवितांच्या चांगलेपणाबद्दल मतभेद होणार नाही. परंतु असली satire पाडगांवकरांच्या delicate कवितेला मानवण्यासारखी नाही. 'छोरी' चें वेगळेपण हाच नवा धोका.

पाडगांवकर प्रतिमावादी ( Imagist ) कवि होत चालले आहेत....'प्रतिमांच्या तर मी इतका प्रेमांत पडतों की ...' हें त्यांचें वाक्य याच गोष्टीचें द्योतक. 'या नव्या प्रयोगांत यश येईल कशावरून ?' असें म्हणत एक नवा प्रयोग पाडगांवकर करीत आहेत व सदानंद रेगे त्यांच्यामागून जात आहेत. ( इतरांची नामावलि येथे कशाला ? )

प्रतिमावादी कविता म्हणजे रूपांपेक्षां संवेदनांचें जग. तेथें visual quality पेक्षा sensation quality अधिक महत्त्वाची. रेग्यांच्या कवितेंत 'चित्रें' अधिक तर पाडगांकरांत 'संवेदना' अधिक. रेगे अजून पुरते Imagist झालेले नाहीत. अशा तऱ्हेच्या कवितेचा इंग्लंड-अमेरिकेंतील इतिहास ध्यानांत घेण्यासारखा आहे. Sitwell, H. D. F. S. Flint, Ezra Pound इत्यादि मंडळींनी तीन तपांपूर्वींच हा प्रयोग करून पाहिला व दहाबारा वर्षांहून अधिक काळ ही कविता लोकांपुढे राहूं शकली नाही. आज तर ही कविता जुन्यांतच जमा. प्रतिमा हें साधन आहे, साध्य नव्हे. ही जाणीव पाडगांवकरांना राहिली तर मराठी कवितेबाबत, इतिहासाची पुनरावृत्ति घडली असें म्हणावें लागणार नाही. '....प्रत्येक चरण–नव्हे त्या चरणांतील प्रत्येक शब्द–प्रतिमासंपन्न असतो' असें म्हणतांना प्रतिमा हा शब्द फारच सवंग (cheap) केला जातो. म्हणून "It is better to present one image in a life-time, than to produce voluminous work", हा इशारा महत्त्वाचा वाटावा. ● ● ●

पण्डित आवळीकर

## गीता–तत्त्व–विमर्श

सामाजिक दृष्टि हा प्रा. श्री. म. माटे यांच्या विचार-सरणीचा एक प्रधान विशेषच बनलेला आहे. ते अध्यापन करोत, कथा-कादंबऱ्यांसारखें ललित अगर शास्त्रीय लिखाण लिहोत किंवा अस्पृश्यतानिवारणासारख्या चळवळी हातीं घेवोत त्यांची समाजमनस्कता त्यांत दिसल्याशिवाय राहणार नाही. भगवद्गीतेसारखा परमार्थपर ग्रंथ. तो त्यांनी उतार-वयांत विवेचनासाठी घेतलेला, पण त्यांतहि त्यांनी आपली सामाजिक दृष्टि कायम ठेवली आहे. सामाजिक दृष्टि म्हटली की, बुद्धिप्रामाण्य, ऐहिकता, भौतिकशास्त्रप्रवणता व उदात्त आणि व्यापक जीवननिष्ठा हीं तिच्यामध्ये येतातच. यामुळे भक्ति–ज्ञान–वैराग्यादि साधनांनी मिळणारा मोक्ष किंवा होणारी ईश्वरप्राप्ति यांकडे त्यांचा ओढा नाही. तथापि गीतेवर आजपर्यंत झालेल्या भाष्यांपैकी लोकमान्यांच्या गीतारहस्यांत प्रतिपादिलेला कर्मयोग प्रा. माटे यांना मान्य दिसतो. कारण तो त्यांच्या ऐहिक दृष्टिकोणांत संपूर्णपणें बसत नसला तरी तो त्यांना अगदी जवळचा आहे. कारण प्रत्यक्ष भगवान् कृष्णाची सुद्धा दृष्टि सामाजिकच होती असें त्यांचें मत ( पृ २९० ) आहे.

गीतेकडे पहण्याची ही विशिष्ट दृष्टि हाच प्रा. माटे यांनी नुकत्याच प्रकाशित केलेल्या ‘ गीतातत्त्व–विमर्श ’ नांवाच्या प्रकृत निबंधसंग्रहाचा ठसठशीत निराळेपणा आहे. नाही तर आजवर झालेल्या गीतेवरील अजस्र लिखाणानंतर अशा पुस्तकाच्या प्रकाशनाची लेखकाला आवश्यकता दिसली नसती व वाचकांनाहि हें लिखाण वाचण्याची उत्सुकता राहण्याचें कारण नव्हतें. पण वस्तुस्थिति तशी नाही. श्रद्धाळू किंवा भाविक मंडळींना प्रा. माटे यांची विचारसरणी पाखंडी वाटली तरी आधुनिक विचारवंतांच्या दृष्टीने ती निःसंशय उद्बोधक ठरल्याशिवाय राहणार नाही हें प्रारंभींच सांगून टाकलेलें बरें.

गीतेंत भक्ति, ज्ञान व कर्म या भव्य परमार्थविचारांचा मुख्यतः ऊहापोह केलेला आहे हें खरें; तथापि या मुख्य विषयाच्या चर्चेत अनेक उपप्रश्नांचाहि उल्लेख भगवंतांनी केला आहे. असेच उपप्रश्न माटे यांनी आपल्या वीस निबंधांत, मुख्य प्रश्न वगळून, विचारार्थ घेतले आहेत, आणि या असल्या अंतरंग-विचाराबरोबर गीतेचें थोडें बहिरंगहि चर्चिलें आहे.

भगवद्गीता हा मोक्षशास्त्रावरील प्रमाणभूत ग्रंथ समजला जात असला तरी गीतेच्या रचनेंत व बांधणींत शास्त्रीय ग्रंथाचा रेखीवपणा पूर्णतया नाही. तो पौराणिक थाटाचा, शिथिल व लोकाभिमुख ग्रंथ आहे. त्यामुळे त्यांतील तात्पर्याबद्दल परस्परविरुद्ध मतें प्रकट झालेलीं आहेत. तीच गत गीतेंतील चर्चेच्या आधारास घेतलेल्या भीष्मपर्वातील कथा-प्रसंगांचीहि आहे. हल्लीची गीता आहे तशी समरांगणावर सांगणें शक्य होतें काय अशीहि शंका येतेच. प्रा. माटे यांनीहि पुढील कांही शंका विचारार्थ मांडल्या आहेत. उद्योग-पर्वातील कृष्णशिष्टाईच्या चर्चेवरून द्रौपदीच्या अपमानाचा सूड घेणें यासाठी कौरवांशीं युद्धच करावें असा बहुतेकांचा कल झाला होता. असें असतां अर्जुनाला युद्धप्रवृत्त करण्या-साठी कृष्णाने त्याला परमार्थ-विचार सांगत बसणें विसंगत आहे. म्हणून वरील हेतूशीं सुसंगत अशी कृष्णाने सांगितलेली मूळची गीता निराळीच असली पाहिजे ( नि. ६ ). “ भारतीय युद्धामुळे कुलक्षय होईल व देशावर सामाजिक नरकवासाची आपत्ति ओढवेल ”

---

**गीता–तत्त्व–विमर्श** — [ लेखक : प्रा. श्री. म. माटे; प्रकाशक : ग. ल. ठोकळ, ठोकळ प्रकाशन, ६२ बुधवार पेठ, पुणें २. किंमत ५ रुपये. ]

या अर्जुनाने प्रथमच उपस्थित केलेल्या शंकेला श्रीकृष्णाने गीतेंत उत्तर दिलेलें नाही. यामुळे कृष्णाच्या सामाजिक दृष्टीचा उपमर्द होतो. म्हणून व्यासांच्या हातून ही भगवद्गीता अपुरी राहिली आहे ( नि. १९ ).

त्याचप्रमाणे 'गीता लोकप्रिय कां ?,' 'गीतेचा शाश्वत संदेश,' 'भीति आणि आश्वासन' इत्यादि निबंधांत गीतेच्याविषयी विचार-प्रवर्तक चर्चा केलेली आहे. प्रा. माटे यांनी चर्चेला घेतलेले उपप्रश्न, चातुर्वर्ण्य, कर्मसिद्धान्त, पुनर्जन्म, ईश्वरी अवतार, प्रपंचाची दुःखमयता, दैववाद, मानुषी संपत्ति, आणि ईश्वराच्या विभूति इत्यादि आहेत. वरील सर्व प्रश्नांची बुद्धिवादी चर्चा करून कांही ठिकाणीं गीतेविरुद्ध मतें देण्यांत आलीं आहेत. याचें कारण प्रा. माटे यांच्याच शब्दांत पुढीलप्रमाणे आहे. "कित्येक सहस्र वर्षांपूर्वी बनविलेलीं तत्त्वज्ञानें आणि घातलेलीं बंधनें हीं शाश्वत काल टिकून राहणें सर्वथा अशक्य आहे. भौतिक शास्त्रांचा उदय झाल्यापासून पूर्वीच्या व्यवस्था गैरव्यवस्था वाटूं लागल्या आहेत. जें परमेश्वराने केलें असा समज रूढ होता तें मानवाने केलें आहे असें स्पष्ट झालें आहे. 'तस्मात् शास्त्रं प्रमाणं ते' हा गीतेंतील उपदेश आतासुद्धा लागूं पडण्यासारखा आहे. पण शास्त्र कोणतें हाच काय तो मतभेदाचा मुद्दा उरतो" ( प्रस्तावना, पृ. ६–७ ).

प्रा. माटे यांची प्रारंभीं सांगितलेली विशिष्ट सामाजिक आणि प्रपंचविज्ञानी किंवा जीवन-निष्ठ दृष्टि पुढील निबंधांत विशेष उठावाने प्रकट झाली आहे :—'चातुर्वर्ण्यं मया सृष्टम्', 'मम तेजोंऽशसंभवम्', 'मानुषी संपत्तीला स्वतंत्र स्थान हवें', 'प्रपंच दुःखमय आहे काय ?' तसेंच 'नरक नव्हे-कर्तव्य' हा प्रा. माटे यांनी श्री. डिंगरे यांना उत्तरादाखल लिहिलेला निबंध त्यांच्या वादकौशल्याचा आणि उपरोधाचा नमुना म्हणून अवश्य वाचनीय आहे. त्यांत त्यांचें महाभारताचें सूक्ष्म निरीक्षणहि दिसेल.

प्रकृत पुस्तकांतील निबंध एकाच वेळीं व एकाच विषयावर लिहिलेले नाहीत. त्यामुळे त्यांमध्ये पुनरुक्ति आढळते. यांपैकी कांही निबंध प्रा. माटे यांनी गीतेंतील तत्त्वांचा विमर्श करण्यासाठी मुळांत लिहिलेले नव्हते. ते त्यांनी गीतातत्त्वांशीं नाममात्र संबंध जोडून या पुस्तकांत समाविष्ट केले आहेत ( उदाहरणार्थ :—१, २, १२, २० ). परिशिष्ट २ मध्ये गीतेमध्ये असलेलीं कांही पठनीय चतुर्थकें ( म्हणजे चवथे चरण ) दिलीं आहेत. त्यांपैकी कांही स्वयंपूर्ण नाहीत. उदा०—हृष्यामि च मुहुर्मुहुः, तत्र का परिदेवना, न तेषु रमते बुद्धः वगैरे.

परमार्थ आणि व्यवहार यांची सांगड घालणें, किंवा तें तर राहोच, परमार्थ-ग्रंथांकडे प्रापंचिक किंवा व्यावहारिक दृष्टीने पाहणें ही कल्पनासुद्धा गीतेच्या कांही वाचकांना सहन होण्यासारखी नाही म्हणून माटे यांचीं मतें अशांना पटतील असें नव्हे. तथापि अशांनींहि हे निबंध मुळांतून शांतपणें वाचावे. त्यांत माटे यांची परिपक्व चिंतनशीलता, व्यासंग, विचार-स्वातंत्र्य, खास मराठी शैली इत्यादि विलोभनीय विशेष त्यांना आढळतील. आधुनिक बुद्धिवाद्यांना तर हा निबंध-संग्रह अवश्य वाचनीय आणि मननीय वाटेल यांत शंका नाही. असे विचार-प्रवर्तक निबंध, प्रा माटे हे रुग्णावस्थेंत असतांहि त्यांनी प्रकाशित केले याबद्दल मराठी वाचक त्यांचे ऋणी राहतील. ● ● ●

के. ना. वाटवे

अनुक्रमणिका

पत्रव्यवहार :

# मराठी वर्णमालेंतील आनुपूर्वी

संपादक म. सा. पत्रिका, पुणें यांसी :

स. न. वि. वि.

म. सा. पत्रिकेच्या गेल्या अंकांत प्रा. जोग यांनी वरील विषयावर लेख लिहून या प्रश्नाला योग्य प्रकारें चालना दिली याबद्दल त्यांचें अभिनंदन करून, या बाबतींत आम्हांला सुचलेले विचार थोडक्यांत मांडीत आहों.

(१) थोडा इतिहासः—भारतांतील बहुतेक भाषा संस्कृतोद्भव असल्यामुळे व प्रचलित भारतीय बोलभाषांमध्ये बहुसंख्य संस्कृत शब्द जसेच्या तसेच वापरण्यांत येत असल्यामुळे संस्कृत वर्णमालेंतील क्रम स्वीकारणें क्रमप्राप्त व योग्यच आहे. देशी भाषांचें वैशिष्टय ज्या ठिकाणीं प्रामुख्याने प्रत्ययांत येतें तेथे जरासा क्रम बदलणें योग्य झाल्यास तो बदललाच पाहिजे. या बाबतींत मुख्य विचारांत घेण्याजोगी गोष्ट म्हणजे प्रचलित बोलभाषांचा अवतार प्रत्यक्ष संस्कृतापासून न होतां मध्यंतरीं महाराष्ट्री, शौरसेनी इत्यादि प्राकृत भाषा व त्यानंतर निरनिराळ्या अपभ्रंश भाषा या क्रमाने त्या संस्कृतापासून उत्पन्न झाल्या आहेत.

(२) वर्णमालेंत प्रथमतः स्वर व त्यानंतर व्यंजनें हा क्रम जरी सर्वत्र दिसून आला तरी निरनिराळ्या व्याकरणकारांनी दिलेले वर्णक्रम त्या त्या व्याकरणग्रंथाच्या प्रक्रियेला उपयुक्त होतील या दृष्टीने देण्यांत आले आहेत व त्यामुळे वर्णक्रमामध्ये व स्वरसंख्येंतहि भिन्नता दिसून येते. प्राचीन व्याकरणग्रंथांपूर्वी प्रांतिशाख्य व शिक्षा ग्रंथांतहि—विशेषतः वाजसनेयि प्रातिशाख्यामध्ये—दिलेल्या वर्णमालेला अनुसरून प्राकृत व्याकरणांमध्ये तो दिला गेला व तोच आज प्रचलित भाषांच्या व्याकरणांमध्ये दिसून येतो.*

संस्कृत भाषेंतील स्वर व व्यंजनें यांपैकी कांही जरी प्राकृत भाषांतून वापरण्यांत येत नसलीं तरी संस्कृतमधील परसवर्णाऐवजी अनुस्वाराचा वापर जास्त करण्यांत आला व विसर्ग नाहीसा झाला. त्याचप्रमाणे सानुनासिक स्वरोच्चारणहि अधिक प्रसृत झालें. हल्लीच्या प्रचलित भाषांमध्ये पुष्कळ ठिकाणीं संस्कृतोद्भव शब्दांऐवजी मूळ संस्कृत शब्द वापरण्याचा प्रघात सुरू झाल्यामुळे प्राकृत शब्दांमध्ये न दिसून येणारे ऐ व औ हे स्वर, पुष्कळशीं जोडाक्षरें व विसर्ग इत्यादि वर्ण या भाषांतून दिसून येतात. एकंदरींत संस्कृत भाषेपेक्षा थोडे अधिक वर्ण हल्लीच्या प्रचलित भाषांमध्ये दिसून येतात. इंग्रजी भाषेंत दिसून येणारे उच्चारहि प्रचलित भाषांमध्ये दिसून येतात. उदाहरणार्थ, गॉल (गुजराथी) म्हणजे गूळ, यांतील ऑ.

तात्पर्य, भारतीय भाषांमध्ये वर्णसंख्या फार मोठी असल्याने व क्रमहि भिन्नभिन्न असल्याने वर्णांची संख्या व आनुपूर्वी निश्चित करणें कठीण होऊन बसलें आहे. ही गोष्ट प्रा. जोग यांनी आपल्या माहितीपूर्ण लेखांत उत्तम रीतीने दाखवून दिली आहे.

या बाबतींत खालील विचार उपयुक्त होतील या समजुतीने थोडक्यांत देत आहों.

(१) स्वरांच्या बाबतींत ऱ्हस्व व दीर्घ हे दोनच प्रकार विचारांत घ्यावे. प्लुताचा अंतर्भाव दीर्घांत करावा व त्याप्रमाणे तो केलेला दिसून येतो. मराठींत प्लुत संबोधनाशिवाय

* वाजसनेयि प्रातिशाख्य ८।१-२५.

फारसा आढळून येत नाही. ॲ व ऑ ह्यांचा ह्रस्व ए व ह्रस्व ओ यांत अंतर्भाव व्हावा.

( २ ) अनुस्वाराचा उपयोग सर्रास आढळून येत असल्यामुळे, परसवर्णाच्या ठिकाणीं अनुस्वारच द्यावा. याला हेमचंद्राच्या व्याकरणांत आधार आहे. + संस्कृत परसवर्णांच्या जागीं 'वर्गेन्त्यो वा' ८. १. २५ या सूत्राने विकल्पाने अनुस्वार होतो. उ. घंटा–घण्टा; पंक–पङ्क इत्यादि. अनुस्वार हा निराळा वर्ण मानून वर्णमालेंत त्याचें स्थान ज्या स्वरानंतर तो येईल त्या स्वरानंतर व्यंजनाच्यापूर्वी समजण्यास हरकत नाही. विसर्गाच्या बाबतींतहि याप्रमाणे करण्यास हरकत नाही.

(३) अनुनासिकाला वर्णमालेंत निराळें स्थान देण्याचें कारण नाही. तो स्वराचाच–उदात्त, अनुदात्त व स्वरिताप्रमाणे–एक गुण समजावा.

(४) क्ष व ज्ञ यांच्या मूळ उच्चारणाकडे जाऊन त्यांना वर्णमालेंत निराळें स्थान न देतां क् + ष् व ज् + ञ् या संयुक्त व्यंजनांमध्ये त्यांची गणना करावी. ळ हा संस्कृतांत ड च्या जागीं दिसून येत असला* तरी मराठीमध्ये तो लच्याच जागीं फार वेळां आढळून येतो. त्यामुळे त्याचें स्थान ल नंतर घ्यावें. उ. केवल–केवळ; अलस–अळस वगैरे. तात्पर्य, खालील क्रमाप्रमाणे अनुस्वाराची आनुपूर्वी होईल.

अ, ( केवल 'अ' शब्द ), अइग, अं, अः, अक्; आ, आई, आं, आः, आक् वगैरे. अङ्क व अञ्जन हे शब्द अंक व अंजन याप्रमाणें लिहून ते अकठिन, अकरण या शब्दांपूर्वी घालावे. संस्कृत कोशांत मात्र परसवर्णच ठेवावा लागत असल्याने — कारण तसें लिहिणेंच शुद्ध आहे—अङ्क, अङ्ग हे शब्द 'अघ' च्या पुढे येतील. त्याप्रमाणेच अञ्जन व अञ्जलि हे शब्द 'अज' शब्दाच्या पुढे येतील.

+ वर्गेन्त्यो वा । ८. १. २५.
* डो लः । हेमचंद्र ८।१।२०२.

**प्रा. जोगांच्या सूचनांशीं क्रमांकाप्रमाणे मतभेद.**

( १ ) मराठी वर्णमालेची आनुपूर्वी संस्कृतासारखी करावी. मात्र मराठींत जेथे वैशिष्ट्य असेल तेथे बदल करावा.

( २ ) ळ ला स्थान ल नंतर द्यावें. क्ष व ज्ञ यांना निराळें स्थान नसावें. क् + ष् व ज् + ञ् या संयुक्त व्यंजनांचींच तीं उच्चारणें आहेत. हीं जोडाक्षरें स्वतंत्र मानल्यास इतर जोडाक्षरांनी काय पाप केलें आहे की त्यांना स्वतंत्र स्थान नसावें !

( ३ ) अं या उच्चाराला स्वतंत्र स्थान मानणें इष्ट आहे व जेथे संस्कृतांत अनुस्वार असेल त्या ठिकाणीं तो देतां येईल व तो तसा द्यावाच. पण घंटा, अंत, अंध इत्यादि ठिकाणीं तो संस्कृतमध्यें नसला तरी विकल्पाने लिहिण्यास हरकत नाही; कारण प्राकृत वैयाकरणांनी तो परसवर्णाच्या जागीं करावा असें सांगितलें आहे. हैम व्याकरणाचा आधार मागे दिलाच आहे. अ च्या नंतर केवळ स्वर असलेले शब्द आल्यास उदा. अइग वगैरे, ते झाल्यानंतरच अं घ्यावा. अर्थात् अंक, अंग, अंत हे सर्व शब्द लिहून झाल्यानंतरच अकथित, अक्षर, अग, अग्र इत्यादि शब्द येतील.

( ४ ) विसर्गाला निराळें स्थान अनुस्वारानंतर व्यंजनाच्या पूर्वी द्यावें. 'दुःख' शब्द 'दुकूल' पूर्वी आला पाहिजे.

( ५ ) संयम, संवाद यांतील अनुस्वार हा निःसंशय अनुस्वारच म्हणजे ज्याला परसवर्ण नाही असा असल्यामुळे त्याच्या बाबतींत कांही विशिष्ट धोरण स्वीकारण्याचें कारण नाही. संपर्क, संमिश्र इत्यादि शब्दांनंतरच संयम, संवाद वगैरे शब्द घ्यावे.

( ६ ) अॅ व ऑ हे ए व ओ यांचें ह्रस्व उच्चारण असल्यामुळे त्यांचें परिगणन ( अंतर्भाव ) ए व ओ यांतच व्हावें. मात्र छापतांना ऍ व ऑ असे चिन्हांकित असावेत. अशा खुणा इंग्रजी कोशांत असतात. उदा० Acting हा शब्द ' अॅक्टिंग् ' असा जरी लिहिला तरी तो ए मध्येच आला पाहिजे. ' एक्टिंग् ' उच्चार न होतां तो ए चा ह्रस्व होऊन अॅक्टिंग् असा होतो म्हणून तो अ मध्ये येतां उपयोगी नाही. बॅट् ( Bat ), बेट् ( Bet ) व बेट् ( Bait ) हे तिन्ही शब्द बे मध्येच निरनिराळ्या चिन्हांनी आले पाहिजेत.

( ७ ) अनुच्चारित म्हणून समजण्यांत आलेला व अर्धोच्चारित अनुस्वार उदा० दहीं, कांहीं, त्याने हा शास्त्रीय दृष्ट्या असूं शकत नाहीं. तो अनुनासिक गुणयुक्त स्वरच आहे* व त्याप्रमाणे तो समजावा. लिहितांना त्यावर अर्धचंद्रयुक्त अनुस्वार लिहावा. उदा० दात–दाँत; पाच–पाँच वगैरे. मुखांतील दात, त्याने दाँत धरला आहे, तो स्वभावाने दान्त व शान्त आहे, अशीं दात, दाँत व दान्त रूपें लिहिलीं पाहिजेत व तशी कोशांत आनुपूर्वी असावी.

( ८ ) तत्सम शब्द उदा० चिन्ह वगैरे शब्द हे ह च्या पूर्वी तीं तीं व्यंजनें येतील तसे यावेत. कारण हेम व्याकरणांत वर्णव्यत्यय सांगितला आहे.+ संस्कृत शब्द समजून स्वीकार करण्याचें मनांत आणून ह नंतर तीं तीं व्यंजनें लिहिण्यास हरकत नाही. उदा० ब्राह्मण–ब्राम्हण, चिह्न–चिन्ह, ह्रस्व–ऱ्हस्व, आह्लाद–आल्हाद.

या आमच्या सूचना तज्ज्ञांपुढे आम्ही विचारार्थ मांडीत आहों. या विषयाला चालना मिळून शुद्धलेखनसमितीप्रमाणे एखादी समिति नेमून याचा निर्णय झाल्यास तो कोशकारांना व इतर ग्रंथलेखकांना निश्चित-पणें उपयोगी पडेल यांत शंका नाही.

आपले,

का. वा. अभ्यंकर, एम्. ए.

म. दा. साठे, एम्. ए.

* मुखनासिकावचनोऽनुनासिकः । पाणिनि १.१.८

अनुस्वाराची व्याख्या—' स्वरमनु संलीनं शब्दयते इति अनुस्वारः ' अशी आहे.

+ ण्होल्हा । हेमचंद्र.

# साभार-स्वीकार

१. गोमंतक-इतिहास-दिग्दर्शन-ना. भा. नायक, रिवण (गोवा).

२. काश्मीर-सहल-ल. के. तांबे; सौ. लता तांबे, वेस्टर्न इं. सदन, टिळक रस्ता, पुणें २; १॥ रु.

३. गृहविज्ञान-सुभद्राबाई पगार, सयाजीनगर, बडोदें; १०॥ रु.

४. अहिराणी ध्वनिपरिचय-दा. गो. बोरसे, गिरजा साहित्य भांडार, मालेगांव, नाशिक; १॥ रु.

५. श्रीकृष्ण मंजरी-(श्रीप्रतापसिंहराजकृत) संपा.-गो. नागराजराव; चिटणीस सरस्वती महाल ग्रंथालय, तंजावर; १.२५ रु.

६. वैदिक धर्मखंड (भाग १)-श्री. दा. सातवळेकर; स्वाध्याय मंडळ, पारडी; ४ रु.

## व्हीनस प्रकाशन ४१० शनिवार पुणें २, प्रकाशनें—

७. (१) ज्ञानेश्वरी अ. ९ वा-संपा.-द. सी. पंगु; ४.७५ रु.

८. (२) क्रांति-मो. ग. कुंटे; १ रु.

९. (३) चित्रपट-मी व मला दिसलेलें जग-श्री. म. माटे; ७.५० रु.

१०. श्रीविष्णुदासांची कविता-संपा.-नरहर सदाशिव जोशी, खरशीकरशास्त्री; शिवनारायणजी पनपालिया, रामदास पेठ, अकोला; ३॥ रु.

११. वास्तु-व. कृ. वऱ्हाडपांडे; शरचंद्र-बक्षी, गरुड खांब रस्ता; स. नं. ६, नागपूर २; ३ रु.

१२ गीता-तत्त्व-विमर्श-श्री. म. माटे; लेखन-वाचन-भांडार, पुणें २; ५ रु.

१३. छोट्यांची ओळख-श्री. वि. केळकर; किर्लोस्कर प्रेस, किर्लोस्कर वाडी (द. सातारा); १.५० रु.

१४. ज्ञानदेवकृत उत्तरगीता-संपा.-श्रीधर कुलकर्णी; मराठवाडा साहित्य परिषद्, हैद्राबाद (द.); १ रु.

१५. आजकालचा भारत-रमेश थापर, अनु. श्री. रा. टिकेकर; के. भि. ढवळे, श्रीधर प्रकाशन, चिराबाजार, मुंबई २; ५.७५ रु.

१६. अगदी मनासारखं-द. के. भट; के. भि. ढवळे, श्रीधर प्रकाशन, चिराबाजार, मुंबई २; ५२ न. पै.

१७. चाफ्याचीं फुलं-सौ. सुमति पायगांवकर, लाखाणी बुक-डेपो; मुंबई ४; ५० न. पै.

१८. कल्पलता (कविता)-ले. प्रका. पु. मा. वीरकर, न्यू. इं. स्कूल, टिळक पथ, पुणें २; २ रु.

१९. मराठी नाट्यसृष्टि (खंड २ रा, सामाजिक नाटकें, द्वि. आ.)-ले. प्रका. वि. पां. दांडेकर, हाथीखानाजवळ, बडोदें; १० रु.

२०. इच्छामरण प्रोव्हिजन कं. लि. (एकांकिका)-ले. प्रका.-म. वि. गोखले, ८८२ पद्मकुंज.

२१. विषुववृत्ताच्या पलीकडे-वा. भ. कर्णिक; ठोकळ प्रकाशन, ६२ बुधवार, पुणें २; ८७ न. पै.

## कॉंटिनेंटल प्रकाशन, टिळक रस्ता, पुणें २, प्रकाशनें—

२२. (१) दोघांचें विश्व (कथा)-विभावरी शिरूरकर; ३ रु.

२३. (२) रियाझ–मधुकर मंगरूळकर; ३ रु.

२४. (३) आदरांजलि ( प्रा. श्री. ना. बनहट्टी लेखसंग्रह ४) श्री. ना. बनहट्टी; ३ रु.

२५. (४) जावें त्याच्या वंशा – ( नाटक ) माधव कुलकर्णी; १॥ रु.

२६. (५) रात्र आणि इतर एकांकिका –विजय तेंडूलकर; ३॥ रु.

२७. (६) गृहदाह (द्वि. आ. नाटक)– गो. के. भट; २ रु.

२८. (७) जांभळाचे दिवस (कथा)– व्यंकटेश माडगूळकर; ३ रु.

२९. (८) नागवेल – वामन चोरघडे; २॥ रु.

३०. ओलें उन्ह ( कथा )–गंगाधर गाडगीळ; लाखाणी बुक डेपो, गिरगांव-मुंबई ४; ३ रु.

३१. अर्थशास्त्राचीं तीन मूलतत्त्वें– व. गो. सहस्त्रबुद्धे; अ. वि. गृह, प्रकाशन, ६२४ सदाशिव, पुणें २; ८ रु.

## वोरा आणि कं. पब्लिशर्स प्रा. लि. ३, राउंड बिल्डिंग, मुंबई २, प्रकाशनें—

३२. (१) ओंजळ–वामन चोरघडे; १.७५ रु.

३३. (२) मन्या–१ रु.

३४. (३) हद्दपार (सं.) श्री. ना. पेंडसे, १॥ रु.

३५. (४) कथावैभव ( कथासंग्रह ); प्रातिनिधिक कथांचा संग्रह; ५ रु.

३६. (५) कथासरित्सागर – निवडक दहा कथा–संचपेटी; ४ रु.

३७. (६) हेन्री फोर्ड–अनु. अमरेंद्र; २ रु.

३८. (७) पपु–१ रु.

३९. लोकसेवक संच–अमरेंद्र–(१) टक्कर बाप्पा (२) डॉ. श्वाइट्झर (३) विनोबा (४) गाडगे महाराज (५) फादर डेमियन (६) रविशंकर महाराज. मूल्य ५० न.पै. (प्रत्येकी).

४०. तीन गोष्टी–अमरेंद्र; ६२ न. पै.

४१. राखेंतील निखारे–सौ. मृणालिनी देसाई; १.७५ रु.

## महाराष्ट्र प्रकाशन, अमरावती ( विदर्भ )

४२. (१) भिल्ल वीर कालिंग–गो. नी. दांडेकर; २ रु.

४३. (२) पूर्णामायची लेकरं (कादं.) गो. नी. दांडेकर; ४ रु.

४४. (३) जगन्नाथाचा रथ–(नाटक) गो. नी. दांडेकर; १॥ रु.

४५. (४) पद्यबंध–(प्राचीन व अर्वाचिन) संपा.–पुं. ना. देशमुख; १॥ रु.

४६. (५) कोनटिकी– अनु. श्रीकांत राय; २ रु.

४७. मातीचें सोनें (कविता) कृष्णगोविंद; रा. गो. खांबेटे २६।१।१ देवदार स्ट्रीट, कलकत्ता १९; ५० न. पै.

४८. **Jyotisa-Ratna-Mala of Sripatt Bhatta**–Ed. by Murlidhar Gajanan Panse; Deccan College Post-graduate & Research Institute, Poona 6; 12 Rs.

